या येवढ्या मोठ्या काव्यांत कवीनें आपल्या स्वतःबद्दलची माहिती किंवा ग्रंथरचनेचा काळही कोठेंच दिला नाहीं. इतकेंच नव्हे, तर आपल्या नांवाचाही तो उल्लेख करीत नाहीं. ' सामराज ' अथवा ' साम्राज्य ' या नांवाचा एक कवि महाराष्ट्रकाव्यवाचकांच्या परिचयाचा आहे. हा वामनाचा शिष्य असून आपणास ' साम्राज्य वामन ' म्हणवितो. ' बापु, ' , विश्वनाथ, ' ' साम्राज्य ' हे सर्व वामनाचे शिष्य, आपल्या गुरूचा उल्लेख काव्यांत स्पष्टपणें करतात. परंतु ' रुक्मिणीहरणा ' चा कर्ता जो ' सामराज ' यानें आपल्या सबंध ग्रंथांत वामनाचा उल्लेख कोठेंही केलेला नाहीं. यावरून हा ' सामराज ' वामनशिष्य जो ' साम्राज्य ' याहून भिन्न पुरुष असावा असें वाटतें.

काव्याच्या भाषेवरून व दुसऱ्या अंतःप्रमाणांवरून हा वामनाचा समकालीन असून याचा वामनाच्या काव्यांशीं चांगला परिचय असावा असें दिसतें. कोल्हापूर प्रांतीं पुढें मागें याचे आणखी कांहीं ग्रंथ व माहिती मिळण्याचा संभव आहे.

# रुक्मिणीहरण.

( सामराजकृत. )

## सर्ग पहिला.



वंदीं, मना, पाय गजाननाचे, । जे सिंधु कल्पद्रुमकाननांचे, ॥
जे वंदिल्या विघ्न पळोन जाती, । स्फुरेतही फार कवित्वजाती. ॥ १ ॥

जे घेय हातीं बरवी विपंची, । जीच्या गुणें होय विधि प्रपंचीं, ॥
जे राजहंसावरती विलसे, । तीचे पदीं मस्तक ठेविलासे. ॥ २ ॥

वात्सल्य मोठें तुजला विकाशे, । जगद्गुरू, तूं मज लावि कांसे, ॥
आणीक कांहीं तुजला न मागें, । येईन आधार धरून मागें. ॥ ३ ॥

वाचेस जे वाट कदा न फूटे, । जेथें मनाची गति नित्य खुटे, ॥
अद्वैत त्या आड दडोनि राहे, । त्याची किली तूज अधीन आहे. ॥ ४ ॥

जे नित्य मायापट आड लावी, । ते वृत्ति कैसी मज आडलावी ? ॥
भवार्णवीं पाय तुझे जपावे, । तरीच हें ज्ञानसरोज पावे. ॥ ५ ॥

कामानळें जीव महा अहाळे. । याला परब्रह्म कसें न्यहाळे ? ॥
त्वन्मूर्ति चित्तांतुन हे गहाळे. । नसे मला वोळखि ये रहाळे. ॥ ६ ॥

हे बुद्धि माझी मजला चुकावी, । म्हणोन म्या वाट तुझी चुकावी. ॥
मंदांध मी ये भरलों अव्हाटे. । तू दावि आता मज नीट वाटे. ॥ ७ ॥

तूं आंधळ्याची असशील काठी; । हें पांगुळ वागवितोसि पोटीं; ॥
तूं द्रौपदीचा अति साह्यकारी; । असे तुझी दृष्टि परोपकारी. ॥ ८ ॥

त्वां वाढवीला महिमा धुरूचा; । त्वां दीधला बाळकही गुरूचा; ॥
त्वां सोडवीलें व्यसनीं गजेंद्रा; । उपेक्षिसी तूं मज कां, उपेंद्रा ? ॥ ९ ॥

माझा तुला काय विषाद आला ? । किंवा कृपासागर शुष्क जाला ? ॥
प्रसन्न नाहीं मन आजि तूझें ? । कीं आड आलें दुरदृष्ट माझें ? ॥ १० ॥

कीं लागली हे तुज योगनिद्रा ? । न पावशी कां करुणासमुद्रा ? ॥
करूनि दीनावरती कृपा हे । तूं आजि डोळे उघडूनि पाहें. ॥ ११ ॥

तूं आपणा दीनदयाळु ऐसें । जनामध्यें या म्हणवीस कैसें ? ॥
मला प्रपंचांतुनि शीघ्र काढीं, । कीं आपुलें बीरुद आजि सोडीं. ॥ १२ ॥

असेत माझ्या अपराधकोटी; । तथापि मागें पसरून वोटी. ॥
मत्तारिलीं हे कितियेक वेडीं । तूतें घरीं काय असेत थोडीं ? ॥ १३ ॥

अजामिळा पावन त्वांच केलें. । पातित्य नाम स्मरतांच गेलें. ॥
त्वां तारिला व्याध महाभिमानी. । त्वां बैसवीली गणिका विमानीं. ॥ १४ ॥

संहारिलें त्वां खरदूषणाला. । त्वां दीधलें राज्य बिभीषणाला. ॥
तूं अर्जुनाचे तारि अश्व धूसीं. । तूं संकटीं पावसि तद्वधूसी. ॥ १५ ॥

अनेक इत्यादिक उद्धरीसी, । मदर्थ कां संशय हा धरीसी ? ॥
असेच जे जे तुज अंतरेती, । कोण्या उपायें जन ते तरेती ? ॥ १६ ॥

आयुःपयाचा अति गोड प्याला । हळूहळू काळबिडाल प्याला. ॥
त्वद्योग तो या समयांत नाहीं; । चुके कसी हे यमयातना ही ? ॥ १७ ॥

शरीरसंरक्षणमात्र केलें; । वेंचून वायां वय सर्व गेलें. ॥
आतां असे अंत समीप आला, । म्हणोनि तूझा अवलंब केला. ॥ १८ ॥

त्वां घातलें ये मज मोहजाळीं. । कर्मे मला बंधनरूप जाळीं. ॥
हा वासनाबंध कदा सुटेना. । जन्मावळीचें विरडें तुटेना. ॥ १९ ॥

प्रपंच हा दुर्वह कोण वोढी ? । पदोपदीं यास पडेत वोढी. ॥
जेथें निधींचा समुदाय आटे, । कल्पद्रुमांचे न पुरेत साटे, ॥ २० ॥

स्वधर्म येथें न घडेच कांहीं, । कधीं सुखाचा लवलेश नाहीं. ॥
महार्घ येथें परमार्थ जाला. । विवेक दारिद्र्यदशेसि आला. ॥ २१ ॥

माया मला लागट हे न सोडी. । अहो, तुझ्या मन नित्य ओढी. ॥
उमेच संकल्प; विकल्प दोघे, । क्रियेकि तेथें मज काय भोगे ? ॥ २२ ॥

तृष्णापिशाची बहु थार वाढे । त्रैलोक्यसंपत्ति धरून दाढे; ॥
धणेकही नेघुन हे न फाके, । ब्रह्मांड ज्याच्या पदरांत झांके. ॥ २३ ॥

या वासनेची सुजि वोसजेना. । पदानुसधान तुझें सजेना. ॥
निवृत्ति कैसी मजला पचावी, । प्रपच ईला जरि साप चावी ? ॥ २४ ॥

हा क्रोधचाडाळ सदा विटाळी, । सपर्क याचा जन कोण टाळी ? ॥
देहीं वसे वाधिणिसी अहता, । असेस तू येक इचा नियता. ॥ २५ ॥

आधार तू स्थावरजगमाचा. । तू भारद्वी होसि भुजगमाचा. ॥
अपार तूझा महिमा कळेना. । स्वरुप तूझें मज आकळेना. ॥ २६ ॥

असेत तूझीं चरितें विचित्रें । तसींच नामें सकळें पवित्र. ॥
मदीय जिव्हेस अनेक कामें. । कदापि ईला न वसे रिकामें. ॥ २७ ॥

परापवाद अथवा विटाळें । इला कसें नाम तुझे उटाळे ? ॥
जे काटला नित्य महानृतानें । ते क्षाळिजे कृष्णकथामृतानें. ॥ २८ ॥

समस्त शास्त्रास पडेत मौनें. । शुकादिकाही विपरीत भाने. ॥
वेडावती वेद समस्त जेथें, । करू तुझे वर्णन काय तेथें ? ॥ २९ ॥

तथापि गाधेन कथा विचित्रा, । पदोपदीं पावन जे पवित्रा. ॥
तुझे कृपेचा परि ईस पाया । पडे, तया हे नपवे अपाया. ॥ ३० ॥

जे बोल्लिली भागवतीं पुराणीं, । निस्तारिलीं जे पुरुषीं पुराणीं, ॥
पवित्रकर्ता सकळा जगा या, । आधार हा थोर असे जगाया. ॥ ३१ ॥

त्वद्वर्णनीं हे रसना कवीची । प्रवेशता, येति विवेकवीचि ॥
मिळेत ही अर्थ वरे नवेची. । तो वचलाभे जन जा न वाची. ॥ ३२ ॥

असे मऱ्हाटी निजदेशभाषा, । नयेत उक्ती बहुध्या विशेषा, ॥
तथापि जे कीं निजभक्त तूझे । न पाहती ते गुणदोष माझे. ॥ ३३ ॥

अगत्य नाहीं जनरजनाचें. । लागे तुझें ध्यान निरजनाचे. ॥
आराधनीं अन्य उपाय नाही, । समर्पितों याच उपायनाही. ॥ ३४ ॥

करू न जाण बहुशा जपासी, । तथापि लागे मन तूजपाशी. ॥
नेणें(णि) मालावगलादिसेवा । जाण तुजे केवळ पाय, देवा. ॥ ३५ ॥

माझ्या मना, तू जससी खडी, । का भीमकीच्या नव्हसी वराडी ? ॥
हा लेन नाहीं वरपगतीचा. । त लाभ घेईं वरपगतीच ॥ ३६ ॥

असे हरीही निजसोयरा, हो. । याच्या पदाची तुज सोय राहो. ॥
हें ब्रह्म नाना अवतारधारी; । तथापि हा कृष्णच तूज तारी. ॥ ३७ ॥

सत्संग आवश्यक आजि पाहें, । जो ईश्वरप्राप्तिस हेतु राहे, ॥
जो सज्जनांच्या निववी मनाला, । जो लाजवी, बा, वनचंदनाला, ॥ ३८ ॥

राजा असे थोर परीक्षिती, हो. । कीर्ती सुधांशूस परीक्षिती हो. ॥
पुसे कथा तो मग हे शुकासी, । जीणें असे अत्यय पातकासी. ॥ ३९ ॥

द्वैपायना, योगिवरा, द्विजेंद्रा, । पौराणिका, सर्वकथासमुद्रा, ॥
त्या सांगसी कृष्णकथा उदारा, । त्या नाशिती नित्य मनोविकारा. ॥ ४० ॥

कथारसें या मन हें विटेना । श्रीकृष्णपायींहुनि, हो, सुटेना. ॥
कथा पुसे आणिकही नवीना. । कां आपला संशय नाशवीना ? ॥ ४१ ॥

हे रुक्मिणी, देववरें वरोरू, । नेली कशी द्वारवतीस भीरू ? ॥
स्वयंवरीं कृष्ण कसा वरी तें ? । केलें कसें साहस सार्वरीतें ? ॥ ४२ ॥

जिंकूनियां मागध, शाल्व राजे, । प्रताप ज्यांचा जगतींत गाजे, ॥
तेणें विवाहीं विधि राक्षसांचा । केला कसा ? सांग उदार साचा. ॥ ४३ ॥

जाला असे जो उपजोन योगी, । क्षणेकही जन्मसुखा न भोगी, ॥
न आतळे जो द्विज अंशुकासी, । कृष्णीं महा भक्ति जया शुकासी, ॥ ४४ ॥

*कृष्णास तो वदुनि विप्र भावें । प्रवर्तला तच्चरणप्रभावें.* ॥
तत्वार्थ सांगेच परीक्षितीसी । असे कथा हे तुज रक्षितीसी. ॥ ४५ ॥

साहित्यस्वारस्य समस्त वेंचे । शब्दोदधीचे निवडून वेंचे. ॥
पवित्र हे कृष्णकथा रसाला, । जे नित्य आणी रस नीरसाला. ॥ ४६ ॥

गंगाप्रवाहोपम बोध जेथें । न जाय हा काय अशेष तेथें ? ॥
करूनि चित्तें अति सावधानें । हे आयकावी हरिसन्निधानें. ॥ ४७ ॥

जो हा महाविष्णु विराटरूपी, । चराचराची रचना निरूपी, ॥
तो गर्भ राहे मग देवईला. । संरक्षिती येउन देव ईला. ॥ ४८ ॥

सदा निराकार, निरीह भासे, । जें शुद्ध चैतन्यपणें विकासे, ॥
निर्माण त्यापासुन विश्व जालें, । तें देवकीचां उदरास आलें. ॥ ४९ ॥

अव्यक्त जें व्यक्तदशेस आलें, । कारागृहीं तें अवतीर्ण जालें. ॥
मासे अकस्मातच राळसेंही. । तत्काळ आलें मग गाळसेंही. ॥ ५० ॥

हा बाळ सर्वांहूनि आगळा, हो. । गळेंत त्या आपण आगळा, हो! ॥
तत्काळ जालीं उघडीं कवाडें. । तो पावला गोकुळही निवाडें. ॥ ५१ ॥

येऊन पाजी स्तन मावशी हे. । हा काय नेणे मग मावशी हे? ॥
हा मोडिला गाळपणींच गाडा, । न भीतसे बाळक जो लिगाडा. ॥ ५२ ॥

घरीं करी रत्नजडीत सिंपी, । ते माय आगोदर पाय शिंपी. ॥
घालून पायावर दूध पाजी, । ब्रह्मादि विश्वेश्वर ज्यासि राजी. ॥ ५३ ॥

उत्पन्न ज्यापासुन भूतसृष्टी, । काढी तयाच्या बहु पार दृष्टी. ।
जो पूतनास्तन्यविषास प्याला, । ते माय देते गरळा तयाला. ॥ ५४ ॥

घरीं जो विश्रांती श्वशुरसदनीं शेषशयनीं,
सदा योगींद्राचे क्षणभरि पडेनाच नयनीं; ।
पय पाजी त्याचें मुखकमळ दुग्धें करिं भिजे.
सुखें ये मातेच्या करयुगुलतल्पावरि निजे. ॥ ५५ ॥

न जाण प्राग्जन्मीं कवण तप मातेस घडलें?
यदीय प्रारब्ध प्रगटच असें हें उघडलें. ।
जयाचे हे ब्रह्मादिक विबुध लागेत चरणीं,
तया बाळा घेते उचलुन कडे नंदगृहिणी. ॥ ५६ ॥

अलिंदा नदाचे घन, रुचिर चैतन्य मिरवे,
जयाच्या माथाचे नव कुरळ शोभेत बरवे. ।
निजच्छंदें रांगे, विमल तळहातद्वय मळे,
पदस्पर्शे ज्याच्या तरुयुगुल तत्काळ उमळे. ॥ ५७ ॥

अनंत ब्रह्माण्डें स्वउदरदरीमाजि दडती,
तया चैतन्याचें स्तवन करितां वेद अडती, ।
जगत्कर्ता धाता सहज उपजे नाभिकमळीं,
विराजे त्याचा हा रुचिर पदिराम्र अनकुल्वीं. ॥ ५८ ॥

धरूनि हे अर्भकदेहलीला, । जे शोभवी प्रत्यह देहलीला, ॥
हे लोक ज्याच्या उदरांत माती । तें ब्रह्म टाकी वदनांत माती. ॥ ५९ ॥

जें अंगणीं येउनि नित्य खेळे, । मनोदयें जें चिखलांत लोळे, ॥
नंदालयीं बाळक योग त्याचें, । ब्रह्मादिकां दुर्लभ सोंग त्याचें. ॥ ६० ॥

घरामधें अर्भकरूप रांगे, । पदोपदीं जो नवनीत मागे, ॥
ज्याच्या पदीं होति पवित्र गोठे, । ज्याच्या भयें गोरस नित्य गोठे. ॥६१॥

हा आंगणीं घे अगणीत धांवा, । तथापि याच्या न पुरेत हावा. ॥
अग्रण्य भूमीरुह हा चडाया, । निष्णात गोपीगृह ऊघडाया. ॥ ६२ ॥

जो गोविला बाळकयांसुरांनीं, । करीतसे नित्य निवास रानीं, ॥
मुरांबुजीं मंजुळ वेणु वाहे, । गोपांगनांची हरि वाट पाहे. ॥ ६३ ॥

वेणुस्वनें गोपसमूह मोहे; । टाकून धेनू वृषभास दोहे ! ॥
त्या गोपिका होति समस्त मुग्धा, । प्रत्यक्ष ज्या कीं घुसळीत दुग्धा. ॥६४॥

घरोघरीं चौर्य करी मुरारी. । कुलांगनांच्या मुलवी कुमारी. ॥
असे जरी आपण आलकाहीं, । न देय येऊं पण आळ कांहीं. ॥ ६५ ॥

मिळोन तेथें मग गोपिकांहीं, । वदेत येऊन विरुद्ध कांहीं. ॥
आम्ही तुम्हीं काय वदों, यशोदे ! । हा लाडका लेंक घरीं वसों दे. ॥ ६६ ॥

कर्मे करी नित्य महा अचाटें. । केलीं मुलें हीं अवघीं अचाटें. ॥
दारापुढें खेळतसे लगोऱ्या. । लेंकी, मुनाही भुलवील गोऱ्या. ॥ ६७ ॥

हा खेळ खेळे यमुनाकडचीं. । हा दृष्टि लावी लल्लनानितवीं. ॥
असेत वाला सकला निरीहा; । तथापि वोढी उगली निरी हा. ॥ ६८ ॥

पतिव्रता ज्या अति आगळाल्या, । निजव्रतापासुनि त्या गळाल्या. ॥
चौढाळिलें गोकुळ सर्व येणें, । हें लोक बोलों न सकेत भेणें. ॥ ६९ ॥

उन्मूळिलीं काय म्हणोन झाडें ? । हा नासला बाळ तुझांच लाडें. ॥
कसे असे काय वर्न्हीं अरिष्टें । या गोकुळा आणिल हीं अरिष्टें. ॥ ७० ॥

राम, कृष्ण, सरिस, सोदर दोघे. । यादवांस सुत नित्य अमोघे. ॥
त्यांत हा वरिल फार गुणांचा. । धाकुटा चपळ हा अगुणांचा. ॥ ७१ ॥

सांगड्यांस उठवून पहांटे, । नंदसुत सकळांत रहाटे. ॥
पाहतां हृदयतस्कर मोठा, । नेतसे सकळ गोरसमोटा. ॥ ७२ ॥

देवडे पद, उभारुनि बाहे, । गोधनें सकळ हे हरि बाहे. ॥
उठोन त्याची जननी यशोदा । तत्काळ त्याच्या मग जाय शोधा. ॥ ७३ ॥

देखोन ईला हरि चावढावा । धरी यशोदा मग पाव डावा. ॥
बांधे तयाच्या उदरास दावे. । सौभाग्य ईचें कवणें वदावे ! ॥ ७४ ॥

समर्थ मायागिळ ऊरसळाया, । तो गोविला बाळक ऊरसळा या. ॥
मातेस अन्याय समस्त मागे । त्या गोपिकांचे अपराध सांगे. ॥ ७५ ॥

सस्नेह माता मग त्यास सोडी; । तथापि तो नित्य करीच खोडी. ॥
अघासुरा मारुनियां, बकाला, । तसेंच वत्सासुरधेनुकाला, ॥ ७६ ॥

तृणापरी त्या तृणनामकाला, । भगूनियां सौख्यसुकाळ केला. ॥
सर्व प्रकारें व्रज रक्षियेला. । प्रत्यक्ष हा पावक भक्षियेला ! ॥ ७७ ॥

जो नांदवी उत्कट गोपवाडे, । गाती तयाचे सरवे पवाडे. ॥
पीतांबर, श्यामलरूपधारी, । सर्वेत्रवशीकर जो मुरारी. ॥ ७८ ॥

कृत्यस्त्य पादांबुज, माळ कंठीं. । गोवृंद चारी यमुनोपकंठीं. ॥
माथां धरी रम्य मयूरबर्हे. । कर्मे करी नित्य महा अनर्हे. ॥ ७९ ॥

बाहे सिदोरीस उदास अंसीं, । उत्पन्न त्याचें भय होय कंसीं. ॥
अक्रूर तेणें मग धाडियेला. । घेऊन दोघां मथुरेस गेला. ॥ ८० ॥

कंसाबरें लूटुन आणियेलीं. । त्रिवक्र कुब्जा अति नीट केली. ॥
दारीं उभा उन्नत मत्त हस्ती । मारून, ते दंत धरीत हस्तीं. ॥ ८१ ॥

चाणूर हा, मुष्टिक दुष्ट जेठी । धाडीत मर्दूनि कृतांतभेटी. ॥
त्यानंतरें मातुळ देखियेला. । उडोनि कंसावरि कृष्ण गेला. ॥ ८२ ॥

धरून केशीं, मग खाल्ता हा । पाहूनि त्यासीं भय होय ' हाहा; ' ॥
कारागृहें सर्वहि फोडवीलीं; । ते मायबापें मग सोडवीलीं. ॥ ८३ ॥

व्यापार हा कंसवधान्त केला. । ते द्वारके श्रीहरि धाम गेला. ॥
असे रिती हा हरि जन्मलासा । जाणोनि इच्छी कमळा विलासा. ॥
ज्याकारणें होय जळांत मच्छी । ते मानवी देह कसा न इच्छी? ॥ ८४ ॥

कथा हे कृष्णाची सकलजगदानंदजननी.
मनोभावें ईचें श्रवण करिजे नित्य सुजनीं. ।
प्रसंगें श्रोत्यांचे सकलहि महादोष हरती.
यदूत्तंसप्रेमें विषयरसगोडी विरमती. ॥ ८५ ॥

इति श्रीमद्भगवद्भक्तपदानुरक्तकविसामराजविरचिते रुक्मिणीहरणकाव्ये कृष्णजन्मो नाम प्रथमः सर्गः ॥ १ ॥

# रुक्मिणीहरण.

( सामराजकविकृत. )

उत्पत्ति हे आर्यिक भीमकीची, । श्रीकृष्णपादाब्जरतासुरीची; ॥
दौःशील्य जीच्या श्रवणेंच मोडे, । लक्ष्मीपदींचा घर थोर जोडे. ॥ १ ॥
विदर्भदेशाधिप भीमनामा । राजा असे येक उदारधामा, ॥
जो धीर, गंभीर, महाप्रतापी, । जो लोकपालांसहि नित्य दापी. ॥ २ ॥
करीतसे पालन ते महीचें, । जैसेंच घे उत्तम हेम रीचें. ॥
प्रजांपरी पाळितसे प्रजाला, । निजान्वया जो कुलदीप झाला. ॥ ३ ॥
असे तयाची मग मुख्य जाया, । त्याला असे तत्पर ते भजाया. ॥
विनीत अत्यंत, महाकुलीना, । असे पतीचें मन आकळीना ? ॥ ४ ॥
मूर्धन्य जे होय पतिव्रतांची, । जिला महा आवडि ही व्रतांची, ॥
निष्ठा गुणांची बहु त्यास गोडी, । तेही तयाचीं वचनें न मोडी. ॥ ५ ॥
भिन्नत्व त्यांचीं दिसती स्वरूपें, । अखंड चित्तें परि येकरूप. ॥
तीं होति अर्धांगिण येक अर्धें, । चाले महाप्रेम क्षणानुबंध. ॥ ६ ॥
जे पाळिती नित्य अनेक इष्टें, । यथाविधानें करिताति इष्टें, ॥
जे सर्वकाळीं करिताति पूर्तें, । नभे तयाचें तप हें अपूर्वें. ॥ ७ ॥
प्रभेंच त्यांला सुत पांच झाले. । यविष्ठ हो आणि भले निघाले. ॥
रुक्मी असे अग्रज दुष्टबुद्धी, । कदापि याही न धरीच शुद्धी. ॥ ८ ॥
धाकी पिता नित्य तया पहाया, । पदोपदीं लागतसे अहाया. ॥
न आय तो पुत्र कदापि बाळे, । न आपके वाक्य, सदा पिसाळे. ॥ ९ ॥
टाकून दे सुंदर गद्यपद्यें, । त्या यादवांनाच वदे अवद्यें. ॥
म्हणे गुरु शिष्य नव्हे म्हणावा. । यांची तुम्ही सत्वर जीभ राखा. ॥ १० ॥
दळू दळू तो कटु होय मोठा. । आला असे काय कलंक पोटा ? ॥
करी अपमान सदा पित्याची, । न मानिले रीति कदापि त्याची. ॥ ११ ॥
तिथे जरी त्यास बहुत दाटी । तथापि ते बुद्धि न येचि गाठी. ॥
विवेक त्याचे हृदयीं धरेना, । अपाय आरंभें जसा दिसेना. ॥ १२ ॥

रित्साध पोटांतुनि दुःख वाटे, । तथापि त्याचें मन ज्यार वाटे. ॥
संबंध त्यासीं नतुन्या न पाहीं । त्याच्या विचारांतुनि लिप्त कांहीं. ॥ १३ ॥
चितारली मात तथापि त्याची । हा नायकें बुद्धि तथापि तीची. ॥
पदोपदीं येउनि शंकवीला, । तथापि तेणें उर पोकवीला. ॥ १४ ॥
ते भासलेंच मुलखवर्तला, । कदापि नाहींच उदात तीला. ॥
अपुत्र संसार म्हणे असावा, । कुपुत्र पोटीं सहसा नसावा. ॥ १५ ॥
निजोदरीं जे नवमास वाहे, ते मात्र त्यानें कुसही न पाहे ॥
कुलास जेणें अपमान येतें, । सतान तें शल्य कसें न हो तें ! १६ ॥
ते त्या दिवसानुनि नित्य देवी । अनन्यभावें कमलेस सेवी. ॥
असे मुतेचीच तिला अघोरी. । त्या आत्मज्ञानें अति दुःख सोसी. ॥ १७ ॥
न सेविती हे जरि लोकमाता, । फेडील कोणा हा तरि शोक माता ? ॥
येके दिनीं फार विषण्ण झाली, । मलश तीर्थानि पदीं निपाली. ॥ १८ ॥

"महालक्ष्मी, माते, कमलनिलये, हांच मजला;
मला तुझा आतां सकळहि मुदा ही समजला. ।
स्वहा तूं धेनूंची नियत असशी सिंधुदुहिता.
वदरी जाणें मी, जननि, तुजला काय दुहिता ? ॥ १९ ॥
नवांभोधीमध्यें असशि जननिर्वाणलहरी.
परब्रह्माची, थो, नियत असशी तूं सहचरी. ।
महाभाग्ये, माते, न घडति मला काय अनर्थे ?
तुझी आतां येथें प्रगट मजला होत अभयें. ॥ २० ॥
परब्रह्मच्छाये, कपटवनिते, होशि कमला.
प्रपंचामध्येंही जरि दिससि आकस्मिक मला. ।
करीतें निजतो सभय तुज, वैकुंठवनिते,
कटाक्षप्रक्षेपें मज जिववि, रत्नाकरसुते. ॥ २१ ॥
नसे हें निर्वाहें, जननि, मज सामर्थ्य भजनी,
कृपार्चालें, हेला म्हणुन न करीं मांडधजनीं. ।
जगन्माते, येथें बहुत असती बाळ तुजला;
विचारें पाहातां तुजविण नसे मात्र मजला. ॥ २२ ॥
प्रसंगें हे झाले, जननि, मजला वोळखि तुझी.
मनोवाक्कायें मी नियत न करीं स्वामिनि तुझी. ।

तुझ्याही भक्ताला प्रतिपद पडे संकट जरीं,
जगन्माते, तूझा अविहित दिसे लौकिक तरी. ॥ २३ ॥
असो चिंता माझी, जननि, पुरती येथुनि तुला.
नसे माझा कैसा अद्यपि पुरता भोग सरला ?' ॥
असारी संसारीं बहुत भयदाधार धरिला.
कृपाभिक्षा घालीं पदर तुज म्यां हा पसरिला. ' ॥ २४ ॥
अशी इचीं हे स्तुति आयकीली. । प्रसन्न तेही मग तीस झाली. ॥
रुक्मीं तिला दर्शन दीधलें कीं । म्हणे, ' तुझी होइन भीन्न लेकी. ' ॥ २५ ॥
त्यानंतरें जो तिस गर्भ राहे, । तें तेज तें भूतळ कां न साहे ? ॥
क्लेशीं करी तीस बहूत रुक्मी, । म्हणोनि आली उदरास लक्ष्मी. ॥ २६ ॥
तत्काळ आली तिस गर्भछाया, । प्रवेशली येउनि आदिमाया. ॥
आली तिच्या पांडुरता मुखाला, । ते कालिमाही कुचचूचुकाला. ॥ २७ ॥
गजगति गमनीं ते पाउलें मंद टाकी,
प्रतिदिनि उठता हे हात भूमीस टेंकी, ।
त्रिवळि मग तयेची स्पष्ट मोडोनि गेली,
अनुदिन दिर्घनिद्रा तीस येऊं निघाली. ॥ २८ ॥
जविरुनि उदरीं हे गर्भ वाढो निघाला,
तविरुनि कमलाची प्रीति उत्पन्न झाली. ।
यदुपतिभजनाचे डोहळे तीस व्हावे,
प्रतिदिन मन तीचें द्वारकेमाजि धावे. ॥ २९ ॥
तो कांत भाला सदनास तीच्या. । पाहावसे हो वदना सतीच्या. ॥
ते वस्त्र तेथें मुमुर्षा फिरवी; । दोघांत लज्जा तिसरी शिरावी. ॥ ३० ॥
तथापि तीचा धरिला इनोटा, । तेव्हां तयाचा मग हात लोटी. ॥
प्राणेश अंगावरि हात टाकी, । ते आपलें सर्व शरीर झांकी. ॥ ३१ ॥
ते बोलतां त्याजसमक्ष कोडें, । येणांस जीचें विलगेत गोडें. ॥
सलज्ज जो जो बहु होय नारी, । तो तों हिच्या हेतुस हा विचारी. ॥ ३२ ॥
उभ्दून नीतीनिचयास देसे. । जीचें समाधान बहूत रागें. ॥
येणें शिर्षी आरंभिं हो पुसावी, । क्षणेक तेथे मग ते रुसावी. ॥ ३३ ॥
भूमंडळीं लभ्य वयास नाहीं । अशी नसे वस्तु कदापि कांहीं. ॥
ते कां न पावे मग डोहळ्यांला ? । करी तिच्या वल्लभ सोहळ्यांला. ॥ ३४ ॥

धर्मतत्त्वें थोर निधान पोटीं । म्हणोनि त्यांची भरितात ओटी. ॥
औदुंबरीं माळ गळां न घाली, । जे पुत्रजन्मास बहुत भ्याली. ॥ ३५ ॥
असेतरी हे नवमास गेले. । प्रसूतिचे संनिध दीस आले. ॥
येके दिशीं मध्यम राति गेली, । कन्या तिला उत्तम येक झाली. ॥ ३६
जे जन्मल्या मात्र कृतार्थ झाली, । ते म्लान देवी विसरोनि गेली. ॥
अनित्य हें सर्व शरीर तीनें, । न आढळे दूषण हें रतीनें. ॥ ३७ ॥
प्रवीण सर्वांहुनि हा विधाता, । कदापि याच्या न कळेत घाता. ॥
सर्वोपमा मेळविजे अहो ते । तयीच हे सुंदर मूर्त वाटे. ॥ ३८ ॥
चातुर्य येथें चतुराननाचें, । पर्यंत आलें तंव आननाचें. ॥
आकारलें रूप असेल जेव्हां, । तो भूलला काय नसेल तेव्हां? ॥ ३९ ॥
वृत्तांत यारे मग आयकीला । तेणें तिचा उत्सव थोर केला. ॥
द्वारप्रदेशीं बहु होत दाटी, । द्विजांस नाहीं पथीं आडकाठी. ॥ ४० ॥
देता विप्रां कांचनें युक्त गाई; । वादित्रांची होतसे घोर घाई. ॥
जे जे कोणी मागते लोक येती । त्यांच्या तेथें कामना पूर्ण होती. ॥ ४१
करी तिच्या उत्तम बारसाला. । दे दान यस्थास अपार बाला. ॥
ठेऊनि हें रुक्मिणि नाम तीनें, । म्हणे, पहा बालक हें मतीचें. ॥ ४२ ॥
नियोजिलीते विश येक दासी, । जे भूपतीनें करिजे निधानी. ॥
तथापि ते वत्सल राजपत्नी । तें वाढवीलें कि अनेक यत्नीं. ॥ ४३ ॥
त्रिगोंच ते प्रत्यह खेळवाची, । ते पाळणीं सुंदरि हल्लवावी, ॥
कडेसही घे बहु धाकटीला, । जे शोभवीते बहुधा कटीला. ॥ ४४ ॥
खे नित्य शोभे बहु लक्षणांनीं । ते वाढलीसे बहुत क्षणांनीं. ॥
आता पुरी दे मग पट्टराणी । धात्री वृत्तयविध तीस आणी. ॥ ४५ ॥
मिळास जों जों बहु आवडावी, । तों तों तयातविध हे भिडावी. ॥
त्याभोंवती येऊनि नित्य खेळे, । त्यांचेच मांडीवर नित्य लोळे. ॥ ४६ ॥
जे बोबडे बोल तिला सुचावे, । तसेच त्याला बरवे रुचावे. ॥
जे ह्लेच पुत्रें कारें पार पावे, । इच्या गुणीं ते नग पार पावे. ॥ ४७ ॥
ते लाडकी होउनियां गुणांची । वहीस झाली परि दारुणाची. ॥
वैधा जिनें दूषणमात्र खोडी, । ते कन्यका काय करील खोडी ! ॥ ४८ ॥
रुक्मी तिला बोल विरुद्ध बोले, । वचेवु त्यांच्या हृदयांत माले; ॥
तथापि ते राजमता महाराणी । विरुद्ध वाचेस कधी न आणी. ॥ ॥

मुहूर्त वेले तिस पर्यंराला । घरोघरीं वाटिति शर्करादल. ॥
घेले अलंकार तिला नृपानें, । तें लेवनीलें श्रवणाय पानें. ॥ ५० ॥
नये शुकाची तुलनेस चोंची । ती नासिकाही मग माय टोंची. ॥
आणीक काहा तरि मापला कीं । म्हणोन घाली नथ माय नाकीं. ॥ ५१ ॥

तदुपरि निवळे हे भीमकाची कुमारी.
मदननृपति आला यौवराज्याधिकारी. ।
तदवनिभग किंचिद्बालभावासि टाकी.
सभर हृदयदेशा अंचलें नित्य झाकी. ॥ ५२ ॥

क्रमेच तीचीं उजळेंच अंगें, । हे पाजवीली छुरिका अनंगें. ॥
हळू हळू यौवन हें झळके । ईला कसें शैशवही विसरे ? ॥ ५३ ॥
मुखेंदु जों जों परमा सजाया, । तों तों इचा माज उगा दिसावा. ॥
इच्या नितंबा परिमाण याया । तथापि याया इत फार भारा. ॥ ५४ ॥
लीलारसें हे सदनांत वागे, । पाठीं इच्ये हंससमूह लागे. ॥
लाजेत इंचे स्वरीत मोरे, । येती गुरासन्मुख हे चकोरें. ॥ ५५ ॥
अत्यंत त्याची श्रुति हे विकासे । सुवर्णगुणीपरिपुष्प भासे, ॥
उठेल नगोधर हे उठाणें, । या शैशवाचें उठयांति ठाणें. ॥ ५६ ॥
आली तिच्या ते जडता नितंबा. । हासे तिचें तें मुख चंद्रबिंबा. ॥
शोभे तिचे पाडित्य हार वेणी. । प्रतिक्षणीं पेरुनि लेय लेणीं. ॥ ५७ ॥
होतांच हा निर्गम शैशवाचा । प्रवेशलासे गुण केशवाचा. ॥
ब्रह्मादिकाला न कळे कथा, रे, । तें ब्रह्म इच्या हृदयांत थारे. ॥ ५८ ॥
येनार्थ नदाज्ञन नित्य येती, । तेहा प्रसंगें वर वर्णिजेती. ॥
त्यानें गुणीं रुक्मिणि कान देते । शरीर त्याला तरि का न देते ? ॥ ५९ ॥
तो द्वारकेचा वर नित्य गाजे । हे भीमकी ही नरदेव आगा जे. ॥
मनोज मध्यस्थ करू निघाला । मनोविपर्यास उपाय झाला. ॥ ६० ॥
परस्परानें गुण दूत नेती । परस्परें हे अनुरक्त होती. ॥
त्याच्या गुणें मन्मथ ईश नाचे । धनुष्य हें सज्ज तयास साचे. ॥ ६१ ॥
जें कृष्णनामें श्रवणीं शाल्य, । ते मन्मथें ब्रह्म नामन्य केलें. ॥
हे वेदना दुःसह शी वळावी । म्हणोन तिचा स्मर चौक व्याली ? ॥ ६२ ॥
जे आदिमाया प्रकृतिस्वभावें । स्मरे तिला ब्रह्म अनन्य भावें. ॥
येथें तदाकार तदात्म झाली । स्वदेहभावा विसरोनि गेली. ॥ ६३ ॥

यदुपति पदपद्मीं चित्त आसक्ति पावे;
    अवसर मदनाला होच अत्यंत फावे. ।
अगणित मन त्याने तीक्ष्ण नाराच येतां,
    कठिण हृदय तीचें नित्य भेदून जाती. ॥ ६४ ॥
परम विकल, येके आसनीं ते बसेना,
    क्षणभरि जननीचे संनिधानीं असेना, ।
अनुदिन मन तीचें कोटि संकल्प येवे,
    हरिविण विषयांचा स्वाद कांहींच नेघे. ॥ ६५ ॥
विमल कमल हातीं भीमकी घेव नाहीं,
    प्रतिरचन मळ्यांला हे नये देव कांहीं. ।
हरिगुण हरिवेचा चातुरी फार कानीं,
    हरिविण दुसरा हा नावडे शब्द कानीं. ॥ ६६ ॥
अशन वसन तीला सर्वथा हें नमाने,
    हरिरहित सुखाचा हेतु आणीक नेणें. ।
निशिदिन निज लागे ध्यान हें द्वारकेचें.
    तदितर दुसरें तव्यापक द्वार कैंचें ? ॥ ६७ ॥
हरिचरणवियोगें रात्रि तीला न खेटे;
    गुणमन तिजला हे दीसही जाति मोठे ।
कृशतनु तनु झाली, भूक ताहान गेली,
    निखिल निजजनांनी हे असे सांडि केली. ॥ ६८ ॥
त भीमकी हे मग घोण घाली । चिंतासमुद्रीं मविशीं निघाली. ॥
आंगास तीच्या कडमोड आला, ।'मुखेंदुही हा उतरोनि गेला. ॥ ६९ ॥
तत्काळ तन्मलक होय मारी । प्रवेशला येउनि कैरभारी. ॥
सखीजनां सचिव जे न वाटे, । निजे उसां घालुनियां स्वयाहे. ॥ ७० ॥
विकासली पांडुरता कपोलीं, । गेला असे चोळ बहुत खोलीं. ।
जाळी तिला चंदन, चंद्र, वाळा; । घडी घडी विव्हल होय बाळा. ॥ ७१ ॥
सरीसरी होय सरी गळांची. । झाली असे येर्जाह द्दंगळांची. ॥
ते चालतां हे नुनलेव वाळे । शरीर तीचें सुकुमार वाळें. ॥ ७२ ॥
हा पातकी मन्मथ घोर धन्वी, । हे राजकन्या सुकुमार तन्वी; ।
कर्तव्य हेंच इस ऊमजेना, । कदापि कोठें सुख ऊपजेना. ॥ ७३ ॥

ते नित्य होते मग दीस लोटी. । ते यापवी शोकसमुद्र पोटीं, ॥
शरीरसंताप नसे निवाला, । करीतसे नित्य अपन्दवाला. ॥ ७४ ॥

चळपट बहु लागे होय संतत बाळा.
प्रतिदिन मदनाचा होतसे हा उबाला. ।
चतुर तिज समाना सर्व तीच्या वयस्या
असति, परि तिचेच्या नेणती या रहस्या. ॥ ७५ ॥

कुसुमशरशरांनीं जर्जरीभूत झाली,
तदुपरि शरतल्पीं भीमकी हे निजेली; ।
परि हस भगवती घोर निर्वाह आहे,
म्हणउनि कठिणाही वेदना सर्व साहे. ॥ ७६ ॥

निरतिशय रुक्मी हे वेदना आपणाली,
त्वरित बहुत तेथे माय धावोन आली. ।
मग तिस पुसता हा कष्ट भलत दाटे,
नयनयुगि जलाचा पूरही थोर लोटे. ॥ ७७ ॥

न पुसत मज तू गे चित्रशाळेस जासी,
अनियत अथवा ये गेहवापीस न्हासी, ।
सहज निरनिराळे हे नित्य धाडून नाडे
प्रतिदिन फिरशी गे येकटी का अनाडे ! ॥ ७८ ॥

न रुचत तुज निद्रा भूक ताहान मोडे ?
अनियत तुज येती का उगे आंगमोडे? ।
निशिदिनि रमणाचा हा निजध्यास लागे ?
अनि कठिण अकार्था योग अभ्यासल्या गे. ॥ ७९ ॥

अशुभगतिर न लागे का तुला हे विपाका?
नयनिं निज भय काहीं, का करीशी उपासा? ।
सत्वरि उठ बाला अन्नसे जेवि, मूली,
निरन्न तुज आली हे अशी अन्नभूली. ॥ ८० ॥

दिसति मज तुझ्याही सर्व तूझ्या ल्याडा,
तुजच जर्जळ आता होय ताचा निराळा. ।
अगि परिस नाही वेड हा दीसताणे,
अभिनव करुणानीं अन्यथा दोन साने. ॥ ८१ ॥

मज तरि समजेना सर्वथा हें अवस्था.
  न समजत करावी काय ईची व्यवस्था. ।
अनृत वदत नाहीं सर्वथा नोवरेशी.
  निशिदिन जगदंबा तूज राखो परेशी. ॥ ८२ ।
प्रतिवचन न येतां, होय हे घावरीशी,
  प्रगट म्हणत आहे गोष्टि नाहीं बरीशी. ।
प्रतिग्रह नसती या काय लेंका सभा या,
  वहुत सवळ माझी हे जळो व्यर्थ माया! ॥ ८३ ॥
सकलहि कुलदेवी, येकदा ईस राखा,
  प्रतिदिन इस हर्षी फांसवाचेच देखा. ।
नवस नवसिले हे व्यर्थ होऊं न द्यावे,
  इस गुण दिधल्यानें सर्व संकल्प ध्यावे. ॥ ८४ ॥
धांडधांड तिस दावी पोसल्या शायकांला,
  विसरुन मदनाच्या जाति ज्या सायकांला. ।
अतिशयित असे जे राजपत्नी अभिज्ञा,
  सकलहि अनभिज्ञांहून ते होय अज्ञा. ॥ ८५ ॥
सचकित म्हणताहे त्यांशि कोठें पहा, गे;
  झडकरि तुम्हि येथें वैद्य कोणी वहा, गे. ।
घडिभडि इजला हे झांपडीही पडावी,
  म्हणवुन मज वाटे भूतबाधा घडावी. ॥ ८६ ॥
कितियक मग तेथें नैपुणें दासवीती.
  अगणित तिज हातीं सांडणीं टाकवीती. ।
कितियक इजशी या बोलती बोलणारी,
  नकळत तुज झालें काय हें बोल नारी! ॥ ८७ ॥
क्षणभर मग तेथें पाट त्यांचा पडावा,
  दिवस तरि तयांला येक हा सांपडावा. ।
अननिमत तयांचें वाक्य हें आयकेना,
  चतुरपण जयांचें ईपुढें हें विकेना. ॥ ८८ ॥
तदुपरिहि पहावी वैद्य दोन्ही निदानें;
  तदुचित करवीती शिश देवस दानें. ।

धरुन तिरा त्वदर्थी मन्त्रवादी विभूती
  करित असति, जीच्या निर्विकल्पा विभूती. ॥ ८९ ॥
तदपि न धरवे हा धीर यां पोसल्यांला.
  सहज न समजे हो हा इचा रोग त्यांला. ।
अति विविध चरित्रें हाखिलासे मुरारी.
  अधिक मग तियेचें चित्तचैतन्य चोरी. ॥ ९० ॥
अगणित मग बाला दीर्घ निश्वास टाकी,
  मुखकमल तियेचें अंचलें माय झांकी; ।
अनिश उभय पार्श्वी पंसतां हे न भागे,
  क्षणभरि इजला हे झोंप तेही न लागे. ॥ ९१ ॥
तदुपरि नृपपत्नी फार भेऊ निघाली,
  सकरुण दुहितेला आपुली आण घाली. ।
उठवुन निजअंकीं बैसवी तीस माता.
  'अभिलषित तुझें तू, भीमकी, बोल आतां. ॥ ९२ ॥
तू खेळता राक्षस भागलीसी, । कीं दृष्टि लागे तुज चांगलीसी ? ॥
स्वप्नें झाला तुज सापिणीचा, । कीं लागला पालव पापिणीचा ? । ९३ ॥
विकार भासे मज मन्मथाचा, । न सापडे मार्ग मनोरथाचा. ॥
पडे महू विस्मृति हे तुला गे, । कोठें तुझा जाउनि हेतु लागे ? ॥ ९४ ॥
नसे तुझें हें मन आजि ठाईं, । अशा प्रकारें पडली अपायीं. ॥
होईल शोकें हृदय द्विधा, गे, । हासेत या तूज भवद्विधा ये ॥ ९५ ॥
न लेति जे लोचन अंजनाला, । तथापि हे निंदिति खंजनाला. ॥
दिसेत वर्णे जपजागराचे, । करू नको सोदर सागराचे. ॥ ९६ ॥
असीम लावण्य तुझें शरीरीं. । लाधेल हें कोण तरी शरीरी ? ॥
यदर्थ चित्तीं अति तापसी, गे, । न आढळे (तो) मज तापसी, गे. ॥९७॥
प्रवेशला कोण असे त्रिवेणी ? । प्रसन्न कोणास पिनाकपाणी ? ॥
त्वदर्थ कोणें पडणीं पडावें ? । हुताशनप्राशन वा धडावें ? ॥ ९८ ॥
आजन्म कोणें उपवास केला, । ज्याच्या असे काम फळास आला ॥
कीं खड्गधाराव्रत वीर सेवी । त्याचीच तू होशिल मुख्य देवी. ॥ ९९ ॥
किंवा असाधारण हे तपस्या. । तू अन्यथा होशिल काय वश्या ? ॥
असा महापूरुष कोण आहे । जो आजि तूझा अनुराग लाहे ? ॥ १०० ॥

तूं तो स्वभावें असशी कुमारी, । हा कोसला दारुण शंबरारी. ॥
रचे तुझा उत्कट धैर्यसेतू. । तूं आपुला हा मज सांग हेतू. ॥ १०१ ॥
शरीर तूझें मज पाहवेना, । त्वद्वेदनाही मज साहवेना,' ॥
बोलोन ऐसें उगलीच राहे. । वरदय तीचा मुखचंद्र पाहे. ॥ १०२ ॥

यदुपतिविरहें जे शुष्क होवोनि गेली,
अविदितहृदया जे मन्मथाधीन झाली. ।
निरवधि जननीचा थोर संकोच झाला,
प्रति वचनप्रसंगीं प्राण कंठास आला. ॥ १०३ ॥
' तुज मज जननी हा सर्वथा भेद नाहीं.
नव्हतिल तुज कैशा मद्गता वेदना ही ? ।
नियमितच अजे मी श्वासनिश्वास तूझा,
तुजविण दुसरा हा प्राण नाहींच माझा. ॥ १०४ ॥
परि, जननि, सुतेचा लाभ हा होय ज्यांला,
नियत समजताहे थोर धिक्कार त्यांला. ।
परम अधम हें स्त्रीजन्म वाईटवाणें,
उपजत परचित्ताधीन तेणें रहाणें. ॥ १०५ ॥
अनुपद तुझिया मी व्यर्थ पोटास आलें,
परम अनुपयोगें भार भूमीस झालें. ।
अगणित अपराधी मी तुझें लेकरूं गे,
अनुचित तुजशीं हे वंचना कां करूं गे ? ॥ १०६ ॥
प्रगट म्हणसि जो हा कोसला शंबरारी,
अविदित तुज कैसा तात त्याचा मुरारी ? ।
वदत वदत ऐसें आडवी लाज आली.
तदुपरि मग बाला सावर्ती मान घाली. ॥ १०७ ॥
अविदित दुहिताभिप्राय विज्ञात झाला.
नरपतिरमणीचा सर्व संदेह गेला. ।
प्रमुदित मग माता कन्यकेला वुझावी,
वदति परम मुग्धा ईश त्वाहे वुझावी. ॥ १०८ ॥
तदुपरि जननीश्री फार उद्विग्न झाली,
पतिसमिप त्वरेशीं तेच वेळेस गेली. ।

सविनय मग त्यासी हात जोडोनि बोले,
अपरिमित जलाचे पूर नेत्रास आले. १०९ ॥
'उपवर मुलि झाली, बोलता येत नाहीं.
वरविषयक चिंता हे नसे होत काहीं. ।
यदुवर, अवतारी, पुत्र जो देवकीचा,
गुणनिधि, अवधारीं, प्राण ये भीमकीचा. ॥ ११० ॥
पदयुगुल हरीचें ईस आदान आहे.
तदितर वरवार्ता सर्वथा हे न साहे. ।
ह्मणवुन, पृथिवींद्रा, गोष्टि हे आयकावी,
त्वरित मुलि उदाय केशवा आजि द्यावी.' ॥ ११ ॥
वचन मग विदर्भाधीश बोलों निघाला.
'मजवरि अमृताचा लोट कोठोनि आला? ।
अगणित परिपाका पुण्य संपूर्ण आलें,
अघटितघटनेनें दैव किंवा उदेलें' ॥ ११२ ॥
तदुपरि मग दोघीं हाच निर्वाह केला.
ह्मणति हरिस देऊं आपुले कन्यकेला. ।
नरपतिमुखिंची हे गोष्टि बाहेर आली,
हळुहळु तनयेच्या कर्णमूलास गेली. ॥ ११३ ॥
परम अधम रुक्मी जो महाक्रोधकोपी.
प्रकट ह्मणति याचे दोष हे कोण योपी? ।
सहजच अविवेकी होय सलुब्ध तैसा,
हुतवहसदनीं हा तैल रुपात तैसा. ॥ ११४ ॥
उपजत खल जो कीं दुष्टबुद्धि स्वभावें,
अनिश यदुपतीशीं वर्ततो वैरभावें. ।
जनक मग विचाराकारणें त्यास पाहे.
अधम वन तयातें पुत्र सक्रोध पाहे ॥ ११५ ॥
तदुपरि हरि निंदा जे मुखातून आली,
स्तुतिपर परभागें ते महा पुष्ट जाली. ।
अनृत वचन काहीं वैखरी हे वदेना
सहज हरिचरित्रा दोष येऊंच देना. ॥ ११६ ॥

कथा हे कृष्णाची सकल जगदानंद जननी.
मनोभावें इचें श्रवण करिजे नित्य सुजनीं. ।
प्रसंगें श्रोत्यांचे सकलहि महा दोष हरतां.
यदुत्तंसप्रेमें विषयरसगोडी विसरतां. ॥ ११७ ॥

इति श्रीमद्भगवत्कृपदानुरक्तकविसामराज विरचिते रुक्मिणी-हरण काव्ये द्वितीय सर्गः ।

---

रुक्मी म्हणे हे तुज काय झालें? । कुळास या दूषण थोर आलें. ॥
विचार तूझा मज हा न माने, । किंवा इचें प्राक्तन कोण जाणे. ॥ १ ॥
विवाहकार्यी स्थिरता धरावी, । त्यां आपुली वांतडि आंवरावी. ॥
जें येकदां फल घडोन येतें । विचारल्यावीण करूं नये तें. ॥ २ ॥
हिमालयें जो अविवेक केला । तसाच त्याचा परिपाक झाला. ॥
ये पार्वतीने पडला कपाळीं । अद्यापि पाहे न चुके कपाळी ॥ ३ ॥
त्यांचेच त्वां हें मत आदरीलें । कां आपलें पौरुष आंवरीलें ॥
मला अभिप्राय कळो न देशी, । त्या यादवाचे गुण नित्य येशी. ॥ ४ ॥
मुखांबुजीं संतत वेणु वाहे, । गोपांगनांचे अपशब्द साहे, ॥
धरी शिरीं केवळ मोरपीसें । तें देवकीचें तरि थोर पीसें. ॥ ५ ॥
जो हा गुणग्राहक रानटांचा, । शोभे सदा वेष वरा नटाचा; ॥
असे अशा संगति गोल्लपांची । तो काय जाणे स्थिति मानुषांची ! ॥ ६ ॥
जेणें सखा मातुल हा वधावा । संबंध त्यासीं सुजनीं वधावा, ॥
त्या मातुलाच्या तरि घातक्याला । कन्या कशी देईल पातक्याला ! ॥ ७ ॥
जो गोकुळीं गोवळ मातलाहे, । वक्षस्थळीं जो हरि लात साहे, ॥
तो ईजला वल्लभ मी करींना । ज्याचा मला हा कळला करीणा ॥ ८ ॥
असे तुझी मूलि महागुणांची, । पत्नी कशी होईल निगुणांची ? ॥
ज्याकारणें हे विलपे वराकी । तो काय ईला समजे गुपत्नी ? ॥ ९ ॥
नृपा तुला उत्तम थोरि जाली । दैवें निवाली परि हेरि जाली, ॥
जे भाळली केवळ गोवळ्याला । कलंक लावी विमळा कुळाला. ॥ १० ॥
जाणों नको यास मनुष्य देही. । असे सदांचा हरि हा विदेही. ॥
निर्द्वंद्व, निःसंग, महा अकर्मी, । याची नसे दृष्टि मनुष्यधर्मी. ॥ ११ ॥

लज्जा न पावे हरि अग्रजाचा, । जो गोकुळग्राम समग्र जाची, ॥
जो नित्य वृंदावनभू विहारी, । जो गोपकन्या वसनांस हारी, ॥ १२ ॥
सग्राह्य जन्मांतर कृष्णकाळा, । कदापि नाहीं वचनास ताळा. ॥
कदापि जो धर्म, अधर्म नेणे, । हा येक पाटश्वर वृत्ति जाणे. ॥ १३ ॥
हा एक जाणे विधि या हत्याचा । विचारितां केवळ शाहल्याचा ॥
हा हुरदी घालुन रे चहाणा, । घेऊन काठी, चढवी वहाणा. ॥ १४ ॥
न आइले हे कुळगोत कांहीं, । विचारितां यास ठिकाण नाहीं. ॥
देऊ नको मूलि, लहान राया । जाणो नको गोष्टि अहा वराया ॥ १५ ॥
ज्यांचा सदा कुत्सित नांदपूका, । सुनांस नाहीं तरि कामणूका, ॥
ज्या भक्षिती केवळ ताकघाटा, विकावया गोरस नेति हाटा. ॥ १६ ॥
जो गोरसं गोवळ नित्य घाणे, । तो काय या कामरसास जाणे ॥
मायाबळें केवळ विश्व मोही, । जाला तुला वल्लभ आजि तोही. ॥ १७ ॥
भूतांस जें होउन भूत व्यागे, । ते हे महद्भूत जगांत जागे. ॥
जळीं स्थळीं व्यापक रुप ज्याचें । न मानिशी तूं भय आजि त्याचें ॥१८॥
जाला असे जो उदकांत मासा, । तसाच हा कांसवही अमासा, ॥
त्यानंतरें सूकर घोररुपी, । नृसिंह तो त्याहुनही विरुपी. ॥ १९ ॥
तसाच हा वामन निर्विकारी । झाला बळीचे धरिंचा भिकारी. ॥
जो आपली भार्गव माय मारी, । तुह्मांस तो निर्दय काय तारी ? ॥ २० ॥
गमाविले पौरुष रामरुपें । ते मर्कटें मेळविलीं अमूपें. ॥
रानामधें टाकुन जाय राणी, । असा नसे आणिक हो अडाणी. ॥ २१ ॥
हा आठवा बालक कृष्ण मोठा, । स्ववध त्यासा तुज आजि खोटा; ॥
यालागीं जे जे जन आठवीती, । ते सर्व संसारसुखा मुकेती. ॥ २२ ॥
उत्पन्न जो होय चहू भुजांचा । विर्सांनला अन्वय भूभुजाचा ।
उरीं जयाचे मिरवे, लहासें । या सोयऱ्याचे करितील हासें ॥ २३ ॥
पडे पहा हे अकुळीं कुळीना, । हाची दिसे जोंवपुढे मळीना. ॥
वरी जयीं हे वरदा विचारा । जाईल हे कीर्ति समुद्रपारा. ॥ २४ ॥
हे गोष्टि माझी हृदयीं धरावी, । वार्ता हरींची सहसा त्यजावी. ॥
वसुंधरा उद्वस आजि झाली ! । पुराष्टि किंवा अपथी तुझाली ! ॥ २५ ॥
जो चैद्यदेशीं मदघोर आहे, । विख्यात ज्याचें कुळ, शील पाहे, ॥
आहेच पूर्वीहुन सोयरा जो । स्ववध त्यासीं तुजसीं विराजो. ॥ २६ ॥

कुमार त्याचा शिशुपाल नामा । उत्कृष्ट सर्वांहुन, सार्वभौमा. ॥
उदार, गंभीर, महाभिमानी, । या यादवांला तृणतुल्य मानी. ॥ २७ ॥
विचारिलीं राजकुलें अशेषें । हा स्वाम्यसंबंध दिसे विशेषें. ॥
ये भीष्मकानें तप काय केलें ? । दैवें इच्या हेंच घडोन आलें. ॥ २८ ॥
अत्यंत हा आग्रह देखियेला; । सुताश तो भीष्मक वश्य झाला; ॥
कर्तव्य दुष्टाप्रति काय चाले ? । नेत्रीं विषादें जलबिंदु आले. ॥ २९ ॥
पाचारवी पुत्र समस्त जोशी, । मुहूर्ताची न धरीच गोसी. ॥
जसें तसें केवळ लग्न काढी, । धैर्येभरा सत्वर मूळ धाडी. ॥ ३० ॥
कोठ्या चढ्या मुक्त समस्त केल्या, । प्रमाणग्या आपण देववील्या. ॥
सभोंवते भौवति सर्व सेटे, । यानेत तेथें कितियेक बेठे. ॥ ३१ ॥
स्थळीं स्थळीं मंडप घालवीले, । प्रासाद अत्युत्तम शाडवीले, ॥
सचारिल्या राजसभा प्रशस्ता, । वारांगना आणविल्या समस्ता. ॥ ३२ ॥

त्वरित मुळचिठ्या त्या सोयऱ्यांला लिहील्या,
रथ, तुरग, तुरंगी, पालख्या पाठवील्या. ।
सहज रिपुपणें जो श्रीपतीचा विरोधी,
म्हणवुन मग मार्गे द्वारकेचा निरोधी. ॥ ३३ ॥
न पुसत जनकाला चालवी हातरोसें,
तदुपरि सचिवांची बुद्धि सर्वत्र रोसे. ।
तटति सकल कार्ये, हा पडे हे प्रवाहीं,
बहुतच मन घाली सोदर्याचे विवाहीं. ॥ ३४ ॥
द्विपवर अवलोकी आदरें आंदणाचे,
क्षितिधर अथवा जे भारती अंजनाचे. ।
निवडुनि मग घोडे काढिले फार याने,
जवन पवन जीहीं जिंकिलासे रयानें ॥ ३५ ॥
अति रुचिर रथांच्या आणवी संचयांला
हयनिवह नियोजी जे महासंच यांला ।
मणिखचित अपारा पालख्या, तख्तरावे
घडियडि अवलोकी; हा भरे येच हांवे. ॥ ३६ ॥
पटु पटह, पताका, आतपत्रें उदंडें,
शशिकररुचिवृंदें तें चामरें हेमदंडें, ।

सर्ते, तोडर, पाखरा, सजबुने कंठे, पटे चांगले,
    संले टोप अनेक हा निवडितां ते सोकडी भागले. ।
डेरे, सांवजडीत उंच अवघे, भार्या छर्मोने जरी,
    दाटे सुंदर साखळी नवग ज्या सिद्धान्त होत्या परी. ॥ ४५ ॥
तक्कयांला मदगर्द पोस, सुजन्या, लोडें दुलीचे नवे,
    सतऱ्या अति विस्तृता, सनकप्या, आलोकिले चांदवे. ।
गंजीफा, सतरंज चोपड नरो तें नर्दहा सांग ते,
    त्यांच्या विस्तरो नसोत इतकीं त्याला वंद्य वागते. ॥ ४६ ॥
दासी, दास, सवत्स धेनु, महिषी, दासेरकें, वेसरें,
    रेडे, घोकड, येडके, शशकुमें, सौगंधिक मार्जरें, ।
चित्ते, साजुरे, विहंगम तुरे, जे हे सशाणे घरें,
    लावे, तित्तिर, मोर, थोर बदकें, रावे महासाजिरे. ॥ ४७ ॥
वेला कंकोल, पूर्णफल, खदिर, पत्री, जायपत्री, लवंगा,
    बादामें, आक्रोडें, पिस्तामिस, उतत्या आगयांल्या लवंगा. ।
गोडंब्या, नारिकेळें, खजुर आणि खडीसाकर, शुद्ध चीनी.
    जीरें, सुंठी, मरीचें, हळदि चतुरची, हिंगही, दालचीनी. ॥ ४८ ॥
दाळिंबें, सोनकेळें, पनस, अननसें, आंवळें, मातुलिंगें,
    अंबे, लिंबें, सुरंगें, टरबुज, पपये, अजिरें, हें फलिंगें, ।
बोरें, सीताफळेंही, खरबुज, खिरणी, सुदरें, तूत बोरें,
    सत्ताळें, ऊंस, पुडे, कवीठ, कमरखें, चाळकें सूक्ष्म, थोरें. ॥ ४९ ॥
        गोधूम, तांदुळ, तुरी, मुग, माष, शाली,
            तीळें, तुपें, गुळ, चणे, तिळ येति काळीं. ।
        पानें नवीं, दळदरें, रुचिर विड्याचीं.
            आसेति दिव्य कुसुमें बहु केवड्याचीं. ॥ ५० ॥
सकल संपति यद्यपि आयती, । तदपि होति समस्तहि आयती. ॥
बहुकडे फिरती परिचारिका । बहुत भीति तया अविचारिका. ॥ ५१ ॥
दळण, कांडण, पेरण, चाळणें । वहचणें, निसणें आणि गाळणें, ॥
कणिक, शुद्ध पिठीं, सपिठें रवा, । म्हणति त्या गहु आणिक ओल्वा. ॥ ५२॥
सहज सुंदरसूद, कुटुंबिनी । हळुच त्या मग येति नितंबिनी. ॥
वळवटें वळिती, जिव आटिती, । बहुत पातळ पापड लाटिती. ॥ ५४ ॥

विविध त्या मग घालिति लेणर्णी, । तिरकुटें नसती अति वाणिर्ची. ॥
सहज रम्य निघे बहु तातडी । म्हणुनि होय पुढें अति तातडी. ॥ ५४ ॥

अपरिमित वडे हे वाळती कोहळ्याचे.
दिवस जवळ आले योग्यती सोहळ्याचे. ।
दृढतर तिळवे हे, गोड अत्यंत लाडू,
प्रिय परम जवे हो सोयऱ्या माजि वाडू. ॥ ५५ ॥

निवडुनि शिशुपाला कारणे हा गुळाचे.
अगणित भरतो हे नित्य जेथें नकाचे. ।
तदुपरि वरपक्षी ऱ्हेवी लोक खासे,
घडि घडि जनकाच्या जो विचारास हासे. ॥ ५६ ॥

अविनय तनयाचा देखिला स्पष्ट भारी.
नरपतिरमणी ते रोंचलीसे जिव्हारीं. ।
मुखकमल तियेचें स्वच्छ विच्छाय झाले.
तदुपरि अयिलने आग मोडून आलें. ॥ ५७ ॥

न कळत हृदयेशा स्वांग गेहास गेली.
निजकनकपलंगीं भामिनी ते निजेली. ।
वचन परिजनासी चंद्रवक्रा वदेना.
तनयकृत विचारा व्यक्त होऊंच देना ॥ ५८ ॥

नरपतिदुहितेला माय येता दिसेना,
तदुपरि मग तीचें चित्त कोठें रसेना. ।
घडि घडि निजगेहा आंत बाहेर येत,
अनिमिष जननीची वाट बाला पहाते ॥ ५९ ॥

त्वरित वहुत घाई होतसे आपतीची.
क्षणहि मन न घाली सर्वथा माय तीची. ।
तदपि परिजनाला हेतु याचा पुसेना,
सुलज बहुगुणाची मायही जे दिसेना. ॥ ६० ॥

शुचकुच सखयांची अन्यथा देखियेली,
मग परम शहाणी तत्त्व जाणोन गेली. ।
नरपतितनयेचा सर्व उत्साह आटे,
प्रलयजलधि किंवा लोटला तीस वाटे. ॥ ६१ ॥

रथगित मग मृगाक्षी ते घडी येक राहे,
    अति चकित दहादी शून्य दिग्भाग पाहे. ।
विखर तिस पडे हा, कांहिही आठवेना.
    हृदयकमलकोशीं दुःख हें सांठवेना. ॥ ६२ ॥
अनभिमत विचारें तें तिचें चेत लागे,
    विरहदहन आंगीं मागुती चेतलागे. ।
अपरिमित तियेला येति तेणें उमाळे.
    धडिक म्हणति जाऊ प्राणही हे अमाळे. ॥ ६३ ॥
क्षितिपतितनया जे मन्मथाधीन झाली,
    बहुत सबल तेव्हां मूर्च्छना तीस आली. ।
परम विकल बाला नावरी जे शरीर,
    धरणिवर पडे निश्चेतना ते अधीर. ॥ ६४ ॥
तदुपरि सखिया त्या सर्व धांवोनि येती.
    नवकिसलयतल्पीं तीजला नीजवीती. ।
घडि घडि करिते हे भीमकी घालफेडी,
    अगणित ऋण किंवा मन्मथाचेच फेडी. ॥ ६५ ॥
अनुपद तिस कोणी विजणे जाणवीती.
    कितियक मग तेथें चंदनें आणवीती. ।
कितियक नलिनीचीं तें दळें कोमळेशीं.
    धरिति हृदयदेशीं सगते दीवलेसी. ॥ ६६ ॥
तिजजवळि सख्यांचा बैसला थोर पाळा.
    कितियक रचिती त्या दिव्य कर्पूरमाळा. ।
कितियक मणिबंधीं बांधिती त्या मृणाळें.
    म्हणतिच ‘ शिशुपाला, हो तुझे तोंड काळे. ’ ॥ ६७ ॥
परम विकल तन्वी, हालवील्या न हाले.
    सशपथ सखियांनीं बोलवील्या न बोले. ।
सहज यदुपतीचें नाम जे घेत आहे,
    उघडुन मग डोळे तीकडे मात्र पाहे. ॥ ६८ ॥
मुखरणि सखियांची सर्व समर्द चारी.
    बहुत जवळि केली भूपतीची कुमारी. ।

हळुहळु मग कांहीं श्रीपतीचीच वार्ता,
न वदत तिजसीं हे बोलती तीस धूर्ता. ॥ ६९ ॥
यदुपतिपदवार्ता तन्मुखांतून येतां,
लगबग बहु झाली मूर्च्छेलागीं जातां, ।
सकरुण सख्येशीं भीमकी वाक्य बोले
सहज मृदु, जयाशीं काय पीयूष तोले ? ॥ ७० ॥
कळत कळत होशी आजि कां तू अजाणा ?
अह्णुगनारि कर्ता या नेणसी पञ्चबाणा ? ।
अति कठिण, सखे, हे चाप याचें जळेना !
त्वरित वहत याचीं शं चिता पाजळेना ! ॥ ७१ ॥
स्वजनपवनयोगें होतसे हा उबारा;
अनिश तपवि किंवा सूर्य येऊन वारा. ।
सुमति मज दहाया सर्व तल्पप्रसूनें.
निरखुच, सखि, डोळेझाक केली प्रसूनें. ॥ ७२ ॥
किति दिन परवशा आपला जीव धाडूं !
निशिदिन मदनाला पोडवेंत आडू ! ।
हळहळ बहु झाली होय संसार वाया.
मनवरि चिरलें हे देहदुर्वारघाया. ॥ ७३ ॥
गतिमति मज पाहा का, सखे, लागल्या, गे !
यदुकुलतिलकाचा हा कसा लाग लागे ? ।
दिवस कठिण कंठीं मी पराधीन असता.
गुरुजनकरुणेचा नाडळे हा जिव्हाळा. ॥ ७४ ॥
जिव बहु उगवे हा, गोष्टि कांहीं रुचेना.
निशिदिन मज आता सर्वथा हे सुचेना. ।
भडिर्याद बहु, बाई, बोलती सर्व खारा.
यदुपति मज भेटे कैं जिवाच्या जिवारा ? ॥ ७५ ॥
अविरत पडला हे माडिली या निधीनें.
कठिण हृदय केलें का इयेच्या विधीनें ? ।
अहरह अरि माझा येकसा जीव जाता
निजकुलगुरुतापें वपु निखिल होता. ॥ ७६ ॥

कनक, रजत वेंचें नित्य खंडीच खंडी,
  परि मन जननींचें पातकी हा विखंडी. ।
न पुसत परमार्थी चाल्वी राजकार्यें,
  नरपतिपरिपाटी राखिली या अनार्यें. ॥ ७७ ॥
परम अधम स्वर्मी हा महा तोंडसोडी,
  नियतच वडिलांच्या जी विचारास मोडी. ।
विरत कळि जयानें पेटली आणि मोलें,
  अनुदिन बहुला, गे, बाप यान्याच बोलें. ॥ ७८ ॥
श्रुतिनिवह जयाला बोलती ' नेति नेति '
  निजहृदयनिकेतीं नित्य योगींद्र नेती, ।
निशिदिन हितिकटा हा जयाचाच धंदा,
  घडि घडि बहु त्याची हे घरीं होय निंदा. ॥ ७९ ॥
निजहित समजेना, ल्लित हा होय दोषें.
  तरुन कितिक गेले पातकी नामघोषें. ।
निजपदभजकांची हेलना होय जेथें,
  त्वरित बहुत धावे द्वारकानाथ तेथें. ॥ ८० ॥
सकरुण भगवंता, जाशि तूं आज कोठें ?
  तुजविण पडलें हें जाण संकट मोठें. ।
मजच घर न माने लग्न यांचा बधावें,
  झडकरि बहु माझ्या घांवण्या आजि धांवें. ॥ ८१ ॥
विविधविषयतृष्णादुर्निवारप्रवाहीं
  पडति जन, तयांला नाठवे आजि कांहीं. ।
निजगुणसमुदायें यांस बोढून काढीं,
  झडकरि अथवा ये नाम नौकेस धाडीं. ॥ ८२ ॥
सहज घडुन आलें ये विदेशीं रहाणें.
  ' तुजविण उगवी हे कोण माशीं रहाणे ? ।
त्वरित बहुत आतां येकदां भेटि द्यावी,
  उचलुन अथवा हे आपुली दासि न्यावी. ॥ ८३ ॥
स्मरण तुज, मुकुंदा, कां नव्हे आजि माझें ?
  तुजविण मज माझा देह हा होय ओझें. ।

झडकरि अथवा हा नेशिना जीव देवा !
रवितनयतुलायारूढ देखेन केव्हां ? ॥ ८४ ॥
कृपादर्शी पाहें, मज कवण आहे यदुपती ?
मला या दुष्टाचीं तिखट वचनें नित्य खुपती. ।
सुखें या प्राणेशा नियतच पडो आजि विघडो,
भवन्निंदालेशश्रवण परि हें येक न घडो. ॥ ८५ ॥
महादैत्यश्रेणी अनुदिन असंख्यात वधिशी.
प्रसंगीं ये कैसें अतिशयित ताटस्थ धरिशी ? ।
जया सिंहा मत्तद्विरदकरटस्फोटन घडे,
तयाला जंबूकापसददमनीं संकट पडे ! ॥ ८६ ॥
गजेंद्रासाठीं तूं झडकरि कशी टाकिशि उडी ?
परामर्शा येशी द्रुपदतनयेच्या पडिघडी. ।
ध्रुवप्रल्हादादी प्रियतम महा होति तुजला,
तयापेक्षां कैसें निपट धरिशी दूर मजला ? ॥ ८७ ॥
अनेका जन्माचा परिचय जयासीं बहु असे,
तया तूझें, कृष्णा, कठिण मन सर्वांहुन दिसे. ।
जगज्जीवा, किंवा दुरितचय माझा बहुतसा
अकारुण्य तूझ्या परिणत असा होय सहसा. ॥ ८८ ॥
सुराराध्या देवा मजवरि उदासीन सकळ
कशी जाली ? मी तों निपटच पडें आजि विकल. ।
सहाकारी माझा यदुपति पहा आजिच अडे,
कसा येकायेकीं मजवरि महापर्वत पडे ! ॥ ८९ ॥
अवो बाळे, बाळे जडित तुज वाहेन बरवें.
तिहीं लोकीं तूझें अतिशयित सामर्थ्य मिरवे. ।
मला तूं ये वेळे त्वरित जरि पावेशि जननी,
मनोभावें तूझें अनिश यश गाईन वदनीं. ॥ ९० ॥
यथाकाळीं, काळी, करिन भवदाराधन बरें,
महाकल्पांतींही उपकृति तुझा हे न विसरें. ।
महेशे, कृष्णाचें त्वरित बहु आकर्षण करा,
करीं, माते, आता झडकरि मला येथुनि धरा ॥ ९१ ॥

अनाथांचे नाथे, सुमुखि, विमुखी होसि मजशीं.
  अवस्था माझी हे समजचि; वदों काय तुजशीं ? ।
प्रसंगीं ये होता बहुत मज तूझा भरंवसा;
  जगन्माते, कैसा न पवसिन अद्यापि नवसा ? ॥ ९२ ॥
मला, माते, तूझा कवण मदुन्माद घडला ?
  तुला जेणें माझा विसर, गिरिजे, आजि पडला. ।
कराया बंधूचा त्वरित वदनस्तंभ वगळे
  तुझें कांहीं केल्या, जननि, मन अद्यापि नुगळे. ॥ ९३ ॥
अडे बंधुश्रेणी, सकल सचिवां मोहन पडे,
  धुडावे दुर्वृत्त, प्रबळ, शिशुपाला ज्वर जडे, ।
प्रभावें हें तूझ्या, जननि, जरि अद्यापिहि घडे,
  महाविद्ये, वंद्ये, तरिच घडलें कार्य निवडे. ॥ ९४ ॥
वसति करिसि, माते, नित्य मातकुवाडीं,
  पारि भजक तुला हा मत्त मानंकु वाटी. ।
अमृतमय कृपेची दृष्टि हे पावलीसे
  वहहुन सुरवाडें विद्धि फोंफावलीसे. ॥ ९५ ॥
त्वरित तू, त्वरिते, जरि पावसी, । तरिच दैवतशी मज भावसी. ॥
विनविते तुळजापुरवासिनी, । अभयदायिनि, शंभुसुवासिनी. ॥ ९६ ॥
वचन आइक, कर्णपिशाचिके, । अतिनिगूढपराशयसूचिके. ॥
तुजच सांप्रत हे यक मागणें । मदभिलाष हरीप्रति सांगणें ॥ ९७ ॥
फिरसि लोक तिन्ही वरपक्षिणी, । परम सावध हो हरिपक्षिणी. ॥
झडपिशी दमघोषसुता जशीं । पुरति सर्व मनोरथ हे तशीं. ॥ ९८ ॥
वदत वदत ऐसे सांज होयास आली,
  दिनकरकरलक्ष्मी सर्व संक्षीण झाली. ।
मुखकमल तयेचें म्लान अत्यंत देखे,
  म्हणवुनि कमलांचा बधु बाधव्य राखे. ॥ ९९ ॥
सहज दिनमणी हा अस्त होतांच, एकी
  प्रियतमविरहानें रडती चक्रवाकी. ।
विधिविहितनियोगें वारुणी आदरीली,
  म्हणुनि चरम संध्या काय आरक्त झाली ? ॥ १०० ॥

मज निद्र नलगे, हे वैरिणी चेत झाली,
तगमग सुटलीसे, यावि मध्यात्र आली; ।
क्षणभरि सजणीहो कृष्ण दृष्टी पडेना,
नयनसलिलयोगें चित्रिंचा सांपडेना. ॥ १०९ ॥
अवसर समजेना, सारिका फार बोले.
शुकवचनविलासें चित्त अत्यंत पोळे. ।
अद्यापिहि न बचे हा चंद्र अस्ताचलासी,
यदुपतिविरहाग्नी चेतवीली कळाची. ॥ ११० ॥
चंद्र सोदर सये गरलाचा, । भाव काय समजे दुरळाचा ? ॥
ये शशांक मदनास सहाया, । मी अशक्य परि याय सहाया. ॥ १११ ॥
दुःख दारुण सये विरहाचें । नित्य नूतन चढे विष याचें. ॥
लग्न निश्चित असे परत्यांचें, । मी करीं परि अतःपर यांचे ? ॥ ११२ ॥
बंधु देऊन म्हणे शिशुपाला; । कां कृपा तुज नयेच कृपाळा ? ॥
दीनवत्सल, दयानिधि, ऐसीं । बीरुदें हरि गमाविशि कैसीं ? ॥ ११३ ॥
सांवळ्या, सगुण, नंदकुमारा । राजसा, त्वरित ये सुकुमारा. ॥
मन्मथें झडपिलें मन मासें, । झाडणी करिल पाउल तूसें. ॥ ११४ ॥
जन्म घेशि हरि यादववंशीं, । देवकी उदरतीं निजअंशीं. ॥
अंगनेस मज येच करावें; । हें जगांत बहु नांव करावें. ॥ ११५ ॥
पाव तूं त्वरित, नंदकिशोरा, । राधिकावदनचंद्रचकोरा. ॥
रातलें मन तुझे पदपद्मीं, । नित्य चीड उपजे निजसद्मीं. ॥ ११६ ॥
नंदगोपतनया, अनयारे, । या कसा विसरसी विनया, रे ? ॥
व्यापिलें मज, मनोहरवेषा, । देवकीसुकृतसारविशेषा. ॥ ११७ ॥
अंतरीं सुख तुझें बहु दाटे, । हें वृथा सकळ वैभव वाटे. ॥
एक वेळ मज सन्मुख यावें, । श्रीहरी, चरणदर्शन द्यावें, ॥ ११८ ॥
गोपिकांसि, हरि, दर्शन देसी, । भावपूर्वक अपूर्व वदेसी. ॥
घाणती घुरडे ज्या कुलटा, रे, । पथ हा, हरि, तुझा उलटा, रे. ॥११९ ॥
द्वारकानगरनीरजनेत्रा, । काय होवि मजहून पवित्रा ? ॥
सुदरा तरि, हरी, अथवा, रे । हा विवेक अवघाच निवारे. ॥ १२० ॥
श्यामसुंदर सखा वनमाळी । आणीं सत्वर, सये, गुणशाली. ॥
चाळिता सकळ विश्वविसावा । आठवे पुरुष पंचविसावा. ॥ १२१ ॥

होय जें प्रकट गोवळवंशीं, । वाजवी मदनमोहन वंशी; ॥
वागवी निज शिरोरसि अंसीं, । ब्रह्म तें, सखि, सनातन ऐसीं. ॥ १२२ ॥

नीलनीरजदलद्युति भासे, । देवदे चरण नित्य उभासे. ॥
आणि त्यास, सखि, लागुन पायां, । जाय हें वय अमोलिक वांया. ॥ १२३ ॥
हा मनोगज अनावर मातें; । वारें मज, चराचरमाते, ॥
सिंहवाहिनि, शिवे, जगदंबे, । रक्षि तू, प्रणतभक्तकदंबे. ॥ १२४ ॥
हे रात्रि आली अति अघकारी, । तू रक्षि येथें मज, अंधकारि. ॥
वृषध्वजा, विश्वपते, पुरारे, । केला नसे मन्मथ तां पुरा, रे." ॥ १२५ ॥
वाक्यें इच्या दुःखित फार झाली; । सखी तिशीं स्पष्ट वदों निघाली. ॥
करद्वयें ते उठवी तयेला, । जीणें असे उत्कट शोक केला. ॥ १२६ ॥
"मी काम नेणें, सखि, मन्मथातें ! । आपीकतो या भ्रमरी कथांतें. ॥
हे वेदना काय तुलाच व्हावी, । लोकत्रया मन्मथ आग लावी. ॥ १२७ ॥
पतिव्रता गौतमधर्मपत्नी । ते वंचयीली परम प्रयत्नीं; ॥
ज्याच्या प्रसादें द्विजराज रोगी, । ज्याच्या भयें होय कुमार जोगी. ॥ १२८ ॥
हें घेतलेंसे व्रत सौनिकाचें, । नसे जयाला भय लौकिकाचें. ॥
जो नायकांचा अति घात केला, । त्याचा तसा प्रत्यय यास आला. ॥ १२९ ॥
निदान तू जे सफला मुलाची, । ते पक्वशी होशि महाविलाची; ॥
अशी निरुद्योग करा बसेसी ! । पडेशि यत्नेविण तूं भरोंसी ! ॥ १३० ॥
रुक्मा गुणी हे परता सरेना, । पञ्चेषु तो हा तुज पीछेरेना. ॥
डसे तुला कृष्णभुजग, बाई. । उपाय येथें करितेल काई ! ॥ १३१ ॥
क्षणेक आतां तकवा धरावा, । स्वपत्रिकालेख तया करावा. ॥
मर्दाव शिखापन तूज तैसें, । नयापुढें नर्तन होय जैसें." ॥ १३२ ॥

हें आयके वचन कुंडिननाथपुत्री.
तो काय होय विदुरी मग दीर्घपत्री ? ।
जे आणवी त्वरित राजकस्ति दौती;
ते लेखणी, रुचिर कागद येथ हातीं. ॥ १३३ ॥

बाला, भीमकसार्वभौमदुहिता, जे गाजिली सोदरें,
पूर्वी पुर्वक पत्रलेखरचना केली तिणें आदरें. ।
स्वोन्मादतनिवेदनोक्तिपटुनी, अत्यन्त अभ्यासिलें
श्रीकृष्णानयनार्थ हें निजमनीं क्रिया असे योजिलें. ॥ १३४ ॥

कथा हे कृष्णाची सकल जगदानंदजननी.
मनोभावें ईचें श्रवण करिजे नित्य सुजनीं. ।
प्रसंगीं श्रोत्यांचे सकलहि महादोष हरती;
यदूत्तंसप्रेमें विषयरसगोडी विसरती. ॥ १३५ ॥

इति श्रीमद्भगवद्भक्तपदानुरक्तकविसामराजविरचिते रुक्मिणीहरणकाव्ये पत्रिकालेखो नाम तृतीयः सर्गः ॥



ते भीमकी सर्व उपाय जाणे; । वैदग्ध्य तीचें तिस एक बाणे; ॥
सुदेव नामा द्विज सोमयाजी । स्वकीय दौत्यार्थ मनांत योजी. ॥ १ ॥
जो वेदवेदांगतदर्थवेत्ता, । लक्षांमधें जो द्विज येक वक्ता, ॥
कथा, पुराणें, इतिहास जाणे, । तो काय हे लौकिकरीति नेणे? ॥ २ ॥
अत्यंत आराधक केशवाचा, । नामें करी नित्य पवित्र वाचा; ॥
बोलोन जो गोड बहूत आहे, । असत्य ज्याला सपनीं न साहे; ॥ ३ ॥
तो आणवीला अति गुप्त वाटे, । तथापिही साध्वस ईस वाटे. ॥
हळू हळू तीजसमीप आला, । तेणें नमस्कार तयास केला. ॥ ४ ॥
बसावया आसन देववीलें, । सखी करें अर्चन त्यास केलें, ॥
मन्त्राक्षता हा द्विज तीस देतो । म्हणे, "वर स्वेच्छित पाव आतां." ॥ ५ ॥
अशांत आली तिजला त्रपा हे । सखीकडे किंचितमात्र पाहे. ॥
ते भाव तीचा समजोन गेली. । त्यासीं सखी वाक्य वदों निघाली. ॥ ६ ॥
विषयविषधरीं हे डंखिली आजि भारी.
कवण पुरुष येथें निश्चयें यास आरी? ।
झडकरि बहु आणीं गारुडी द्वारकेचा,
त्वरित बहुत राखें प्राण ये दारिकेचा. ॥ ७ ॥
मुद्रामुद्रित पत्रिका करुनि ते विप्रापुढें ठेविली.
तेणें ते उचलून भीमकसुता सर्वे असे घेतली. ।
येकाकी श्रवणीं तजून मुकुटी जो द्वारके चालिला,
जेणें श्रीपतिपादपंकजयुगीं आत्मा असे वाहिला. ॥ ८ ॥
ते बोळवीत कितियेक तयास आली;
वेगेंच ते सदनरीं मग राहियेली. ।

झाला विषण्ण वितर्क्यातच फार भागे,
कृष्णास ते हळुच तोंडनिरोप सांगे. ॥ ९ ॥
"'सर्वोत्तमा, उत्तम पाय तूझे । देखोन हे नेत्र निवोत माझे. ॥
पाहें तुझी वाट, अनाथनाथा. । सनाथ कैं हा परि होय माया ? ॥ १० ॥
न सांपडे रूपटसा असा हा, । केले जरी तां अवतार दाहा. ॥
ते कोण तूला नवरी वरीना, । मनामधें पाय तुझे धरीना ? ॥ ११ ॥
महाभुजा, राजकुलावतंसा, । मनोरमा, मानसराजहंसा, ॥
चातुर्य तूझें कवणांत आहे ? । या क्षीरनीरा निवडोन पाहें. ॥ १२ ॥
सर्वत्र उच्चावच भेद आहे । वेरं विचारून मनांत पाहें. ॥
दिसेत हे पाण्डुर तक्रदुग्धें । जाणोन घ्यावीं परि हें विदग्धें. ॥ १३ ॥
मी तों नसें, रे, तुज पारखीसी. । पदोपदीं कां मज पारखीसी ? ॥
मी जाणतें केवळ जो हरीसा । तो आजि होसी मज जोहरीसा. ॥ १४ ॥
माझा जळो हा जिव चीसराळू ! । तूं तों जगन्नाथ महाकृपाळू. ॥
वाटे तुझें चित्त सहस्र ठायीं । हा व्याल्ला प्राण तुझेच पायीं. ॥ १५ ॥
तूझी कृपा पातळ फार झाली, । तेणें दशा हे मज आजि आली. ॥
गळेत नेत्रांतुनि वारिधारा । तूं पाव शोकार्णवकर्णधारा. ॥ १६ ॥
स्थळांतरीं देइल तात जेव्हां, । हा प्राण मी ठेविन काय तेव्हां ? ॥
घडोन मार्गा तुज आजि हिंसा, । या सोदराचा जिव होय हिंसा. ॥ १७ ॥
तथापि मी हे विनती करीतें, । तजूं नये ये निज किंकरीतें. ॥
जाईल हा केवळ जीव माझा, । जगामधें लौकिक होय तूझा. ॥ १८ ॥
मी काय नेणें तुज मानसींही ? । नसे तुझा हा अभिमान सिंहीं. ॥
हा देह माझा, हरि, भागलाहे. । गोमायु कैसा हरिभाग लाहे ! ॥ १९ ॥
प्रसन्न, देवा, मुखचन्द्र तूझा । ध्यातो सदा चित्तचकोर माझा. ॥
मी चातकी, तूं घन नीळ, कृष्णा, । तथापि, पाहें, नवजाय तृष्णा. ॥ २० ॥
तूझे पदीं नित्य अनंग नाचे, । तूं भूलवीसी जन अंगनांचे, ॥
त्या गोपिकाही असती सदैवा, । तूं पावसी ज्यां असतांस, देवा. ॥ २१ ॥
मी नंदिनी राजस भीमकाची । होईन दासी परिची मुकुन्दाची, ॥
पावेन तूझ्या चरणारविंदा । प्रसाद ऐसा करिजे मुकुन्दा. ॥ २२ ॥
हा जीव माझा तुजल्य न लाहे, । करीन याची तरि आजि लाहे. ॥
धनञ्जनर्में आहुति इंद्रियाची, । देईन हें निश्चित गाय पायीं. ॥ २३ ॥

तूं आजि माझी करिशी उपेक्षा, । मी जीवनाची न धरीं अपेक्षा. ॥
जसा तसा केवळ काळ कंठीं; । प्रधान मत्प्राण कधीत कंठीं. ॥ २४ ॥
असें नसे संचित पुण्य कांहीं, । जेणें तुझे मी पदयुग्म पाहीं. ॥
आतां कृपा केवळ तां करावी, । स्वकीय दासी स्वकरीं धरावी. ॥ २५ ॥
पाशीं पडे केवळ मी कुरंगी, । ये पंजरीं, रे, अडके विहंगी, ॥
पंकीं पडे दुर्बळ गाय जैशी, । पदोपदीं व्याकुळ होत तैशी. ॥ २६ ॥
तूं सोडवीं जीवविहंग माझा, । होईल येणें पुरुषार्थ तूझा. ॥
त्वज्जामनुत्तमफलमात्र चारा, । तुझे पदीं केवळ याच थारा. ॥ २७ ॥
जैसें तुला मी नवरी न मानें, । करूं नको ज्येष्ठ कदापि मानें. ॥
मी धाकटी होउन धाकटींची । दासी करीं, रे, मज शेवटींची. ॥ २८ ॥
करीन हे केवळ पादसेवा; । घरामधें हा न करीन हेवा; ॥
घेईन पादोदक नित्य तूझें; । टाकीन, देवा, अभिमानबोझें; ॥ २९ ॥
लावीन तूझा पदरेणु भाळीं; । उच्छिष्ट घेईन यथोक्त काळीं; ॥
त्वत्पादनिर्माल्य धरीन माथां ; । गाईन, देवा, भवदीय गाथा. ॥ ३० ॥
मार्गी तुझे लोचनयुग्म लागे, । त्वच्चिंतनीं मानस नित्य भागे, ॥
झाली असे हे वचनीय सीमा; । तूं सर्व जाणेसि, गुणाभिरामा. ॥ ३१ ॥
माझे मनीं जाण विकल्प नाहीं, । करूं नको आणिक कल्पनाही. ॥
धरूं नये संशय यद्वयाचा, । पुढें नये, हे, रस या वयाचा. ॥ ३२ ॥
अनर्कसंपर्क कदापि, पाहे, । प्रफुल्लता हे नलिनी न साहे; ॥
वसेत नाना विपिनांत वल्ली, । अनादरीना सहकार मल्ली'. ॥ ३३ ॥
हा प्राणनाथास निरोप सांगें. । विप्रा, तुला आणिक येक मागें. ॥
हे गोष्टि कोणास कळों न द्यावी, । गुरूपदेशाहुनि गूढ घ्यावी. ॥ ३४ ॥
म्यां वांचणें हें त्वदधीन झालें, । हाता तुझ्या हें यश थोर आलें. ॥
धर्मांमधें उत्कट धर्म, पाहे, । परोपकारासम कोण आहे ? ॥ ३५ ॥
द्विजा नको फार विलंब लावूं, । कदापि तूं रिक्त नकोच येऊं. ॥
जाणेस तूं वैधिक सर्व दीक्षा, । करून चोळें समयप्रतीक्षा. ॥ ३६ ॥
जो द्वारकेची करि पातशाही । वरील तो काय जशातशाही ! ॥
त्याचे मनीं हा मज ठाव व्हावा, । प्रसंग ऐसा बरवा पहावा. ॥ ३७ ॥
कार्यांतरीं सक्त असेल जेव्हां । करू नको गोष्टि मदीय तेव्हां. ॥
होईल आकस्मिक हे अवज्ञा, । उपाय सुटे अवघाच विज्ञा. ॥ ३८ ॥

मार्गी चुकावून समस्त मेटें। तूं द्वारकापत्तन पाव नेटें. ॥
ज्याचे पदीं हा दृढ भाव माझा, । तो सर्व निर्वाह करील तूझा. ॥ ३९ ॥
अपार संसारसमुद्र पाहीं; । तरावया यास उपाय नाहीं. ॥ ।
तें द्वारकेचें घननीळ तारूं । येवोनि येथें, मज शीघ्र तारूं. ॥ ४० ॥

माझा असे परम दारुण ज्येष्ठ बंधु;
चैद्येश्वरा अभिलषी अविवेकसिंधु. ।
धाकेत हे नव, पुरातन कारभारी;
याचे मतीस बहु होय विकार भारी. ॥ ४१ ॥
तू मायबाप, कुळगोत समस्त माझें;
मी भाकरें निपट बाळक आजि तूझें. ।
तू येकदा परमजीवनदान देई,
तो द्वयर्थातनय घेउन शीघ्र येई" ॥ ४२ ॥
नरेंद्रदुहिता असें हळुहळू जन्हीं बोलते,
प्रभातसमयप्रभा तदपि दुष्ट डोकावते. ।
चरित्र समजोनि हें स्तिमित राहिली भीमकी.
द्विजास म्हणते, " द्विजा, परम शीघ्र तू जाय, " कीं. ॥ ४३ ॥
विहगमकुळें महाविटपिकोटरीं वाहती,
सुर्भीतळ हळूहळू सुरभिवातही वाहती. ।
विदर्भभवनीं उठे विविधवाद्यसंघोष तो,
अनेकनुतिपाठकस्तुतिभरेंच जो पोषतो. ॥ ४४ ॥
कल्कलंत कपोती; पूर्व दिग्भाग हासे,
हळुहळु मग तेणें चंद्र निःश्रीक भासे; ।
तशिच उडुगणाला तूटि येऊं निघाली,
तदुपरि तनुता हे दीपशोभेस आली. ॥ ४५ ॥
गलबल बहु जाली दासिकांचा पहाटे,
म्हणवुनि परते हे, मायचा धाक वाटे. ।
सकल निजसख्याही लागतीं जों उठाया,
झडकरि तंव आली भीमकी पूर्वठाया. ॥ ४६ ॥
निरंतर व्यवसायें भागली पार बाळा.
क्षणभरि तिस लागे जागतीमाजि डोळा. ।
तदुपरि गरुडीं हे कृष्ण आरूढ देखे,
यदुतिलक जिचे हा गुंतला पूर्ण भाके. ॥ ४७ ॥

-

अति रुचिर विकासे कांथ पीतांबराची,
प्रकट परम झाली मूर्ति त्या श्रीधराची. ।
निरुपम उमटे हे कुंडलांची झळाळी,
मणिमयमुगुटाची दीप्ति फांके निराळी. ॥ ४८ ॥
अभिनव वनमाळा कंठदेशीं विलासे,
सुरकमल दुजें जो देखतां देव हांसे. ।
यदुपति अवतारी, जो गदाचक्रधारी,
हळुहळु कळसाटीं पावला तो मुरारि. ॥ ४९ ॥
हळुच जव पलंगीं कृष्ण येवोनि बैसे,
मुकुलित तंव होती हे इचे नेत्र ठेसे. ।
क्षणभरि निजअंकीं भीमकी बैसवीली,
मुखकमळिं तियेच्या स्वीय तांबूल घाली. ॥ ५० ॥
तदुपरि रव चाळा आयके सारिकेचा,
यदुपति मग तेणें हारपे द्वारकेचा. ।
सळमळुन उठे ते भीमकी नित्सुरंगी;
मुखकमलसुगंधें लाजवी कस्तुरीशीं. ॥ ५१ ॥
तदुपरि निजशय्या चांचपों जों निघाली,
हरिचरणवियोगें घाबरी फार झाली. ।
उठवुन सखियांतें दीप लावोन पाहे,
नलगत निधि हातीं, ते यथावस्थ राहे. ॥ ५२ ॥
पश्चद्वारें विप्र बाहेर आला, । क्षेमाशंसी त्याजला फार गेला; ॥
जैसा देखे पूर्णकुंभद्वयाला । तैसा त्याला पूर्ण आनंद झाला. ॥ ५३ ॥
सवत्स त्या सन्मुख गाय आली; । सुवासिनींची मग भेट झाली; ॥
देखोन सालंकृत कन्यकेला, । मुहूर्त तेणें अति धन्य केला; ॥ ५४ ॥
अनुपद मग तेथें पातली होमवेळा,
म्हणवुन मग तेणें घाबरा विप्र जाला; ।
अविदित निजगेहा ये महातांतडीनें;
विधि विहित तयाचा होय येके घडीनें. ॥ ५५ ॥
उदयगिरिशिरीं हें भानुबिंब प्रकाशे,
रजनिजनित जेणें कोकशोकाग्नि नासे. ।
मुकुलित कमलांचा भार उल्हास पावे,
मधुकरपटलीला बंधनिर्मुक्ति फावे. ॥ ५६ ॥

द्विज सविनय वंदी सूर्यनारायणाला,
क्षणभरि मग ठेवी वेदपारायणाला. ।
वचन गृहपतीशीं व्यक्त बोले तपस्वी,
" मज गुरुतर कार्यी तां करावें यशस्वी. ॥ ५७ ॥
सकळहि निजपोर्थे रक्षि तू आश्रयाशा;
तुजविण मज नाहीं आणखी आश्रयाशा. ।
सदय उभयकालीं हव्य घे नित्य होमीं.
यदुतिलक पहाया चालिलोंसें, अहो, मी." ॥ ५८ ॥
प्रवासविधि आदरें त्वरित फार केला असे,
निदेश नृपनंदिनीविहित मानसीं हा वसे. ।
कमंडलु करीं धरी, स्मरणमालिका आदरी,
घरांतुन निघे महामुदित होय जो अंतरीं. ॥ ५९ ॥
अतिसभय उलधी हा पुरद्वार जेव्हां,
घरिंहुन सुदलेसें वाटलें त्यास तेव्हां. ।
यदुपतिपुरमार्गा शोधिती राजसेना,
तदपि हरिकृपेनें मार्ग कोणी पुसेना. ॥ ६० ॥
तदुपरि मग त्याची अंगना होय जागी.
" त्वरित उठ " म्हणे हे कन्यकेला वजागी. ।
घडिघडि वदलें जे बहुभाषी चिरांटी,
म्हणवुन बहुधा हे होय ऐसी करंटी. ॥ ६१ ॥
न पुसत रुक्मिणीला द्वारके विप्र गेला,
म्हणवुन इजला हा थोर संताप आला. ।
त्वरित बहुत गेली त्रासि धावोन तेथें,
नरपतितनया हे बैसली श्रांत जेथें. ॥ ६२ ॥
बहुत मुराळे हे फार बोलें निधाली,
तदपि नृपसुतेनें आदरें बैसवीली. ।
हळुच तिस पुणेनें हे निवारीत त्याहे,
पदपि परम अशा बोलता ते न राहे. ॥ ६३ ॥
"अलगट रघु होशी दाल, हें काय केलें !
ल्टिकपण करें या सोदरा आणियेलें !।
न पुसत पति माझा धाडिला हा विदेशा,
झडकरि तुझिया या आगि लागो निदेशा! ॥ ६४ ॥

घडिघडि अन्नाला मागती जें अपत्यें,
अंगिच मज दिसें हें स्वर्ग कां गाईपलें. ।
हळुहळु सरतां या गर्वदा दुर्भमुष्टी;
धृतशिरपदित, बाई, चाल्ती काय दृष्टी ! ॥ ६५ ॥
निरट अपुरतां हे बुद्धि या यक्षभान्नी,
अंगिच थिजवटी हे आणिली काल भान्नी. ।
क्षणभरि मज दृष्टी नावडे ज्येष्ठ धाडी,
अझुणिवरि दृला हा जामुन्यांही न धाडी. ॥ ६६ ॥
सकलांहि कारजेते जीव देऊनि पापी,
परि विरळ मिळाली सून मोठी निवार्णी. ।
तिजहुन नवसांची नाति झाली विवाटी,
अनिश सहचरींनीं खेळतां धान्य वाटी. ॥ ६७ ॥
अवगुण नणंदेच्या चोरट्या पोरट्यांचे
घडिघडि किति सांगू ! सांग या कारट्यांचे. ।
मज तरि स्वप्नींही हा दिसेना अभेला,
अझुणि तरि न लागे आगि यांच्या झुपेल्या. ॥ ६८ ॥
अति मधुर न साहे कोरका कोरप्याला;
अझुणिवरि समस्तों नित्य भाकों कण्यांला. ।
दळिर बहुत लागे भाकरी नाचण्यांची,
जिजवरि मज भाजी आवडेना चण्यांची. ॥ ६९ ॥
हळुहळु जरि सारु होय अत्यंत शुद्धा,
तदपि बहु भुकेनें होतसे नित्य क्षुद्रा. ।
निरुपम घरिचा हा जाच कोणास सांगो !
घडिघडि उदरनें मी धान्य कोणास मागों ! ॥ ७० ॥
परम विरस वाक्ये बोलते जों असाळी,
तंव नरपतिपत्नी येतसे तेच काळीं; ।
लगबग उठतां हे राजकन्येस जाली,
परि बहु अविदग्धा बोलतां ते न भ्याली. ॥ ७१ ॥
हळुच तिस म्हणे हे, " मागसी कां, गव्हारे !
गृहविषयक चिंता सर्व येथून वारे. ।

जडित वलय तीर्णे हातिचें काढियेले,
 द्विजपतिगृहिणीला गुप्तसें अर्पियेले. ॥ ७२ ॥
रुचिरतर तयेच्या वस्तु येताच हाता,
 हलुच 'पति नये का ?' ते म्हणे व्यक्त आता. ।
परम परिजनांची दाटि होऊं निघाली,
 म्हणुन निजगृहातें ते चुकावून गेली. ॥ ७३ ॥
निशि दिवस जयानें सेविजे कृष्णवर्त्मा,
 द्विजतिलक न लागे तो कसा कृष्णवर्त्मा ? ।
अपरिमित पवाडे देवकीनंदनाचे
 विविध, रुचिर, गाता, थोर आनंद, नाचे. ॥ ७४ ॥
अनिश यदुपतीचा हा महाछंद लागे,
 म्हणवुनि आतपथा चालता तो न भागे, ।
अति कठिण अम्हाला चोखटा होति वाटा,
 हरिगुणकथनाच्या फूटला ज्यास फाटा. ॥ ७५ ॥
सहज कठिण आहे काळ जो हा उन्हाळा,
 मकट परम तेथ होय माध्यान्ह वेळा. ।
तदपि हरिकृपेची सावली दाट आली,
 सहज निजसुखाची थोर विश्रांति झाली. ॥ ७६ ॥
त्रिविध मग तदाला पाठिचे येति वारे,
 त्रिविधहि परि जीहीं क्रूर संताप वारे. ।
अगणित सुकृताचे साठवी नित्य साटे,
 अति तिरस्ट तया का मोडती द्वंद्व वाटे ? ॥ ७७ ॥
द्विजवर निजमार्गी नित्य येकांत सेवा,
 सहज हरिकृपेच्या जो शिदोरीस जेवी. ।
यदुपतिभजनाची लागली थोर गोडी,
 हलुहलु विषयांची वासना यास सोडी. ॥ ७८ ॥
तदुपरि उपदेशी आपल्या या मनाला,
 क्षणभरि परि नेदी ठाव जे कामनाला, ।
मदनजनितचिंता सर्वदा जे न साहे,
 यदुकुलमणि जेथें नित्य वेधोनि राहे. ॥ ७९ ॥
५

परम निलज विषया कां पडे हे कुटुंबी,
तुजवरि विषयांची हे पडे नित्य झोंबी. ।
यदुपति तुजला हा ज्या पराङ्मुख कारी,
मदगहृदय तो हा हानिचें काय थोडी ? ॥ ८० ॥

तगमग करिशी हे, व्यर्थ हांवे भरेशी;
क्षणभरि परि नाहीं तूं मन्था नावरेशी, ।
धुडधुड करिशी तूं जो पुढें, तें पुरेना,
तदपि तुज विषादावेग कांहीं थरेना. ॥ ८१ ॥

पुलक पुसत आली या शरीरा जरा हे,
परि हरिभजनाची वासना यांत राहे. ।
विषयसडिशलोभें गुतशी मोहजाळीं;
कवण विषय आता सोडवी अंतकाळीं ! ॥ ८२ ॥

चलन वलन राहे, बोल भाषा न साहे;
जवळि कधि न राहे, नित्य सक्रोध पाहे; ।
अजुणि तरि, मना, तूं शांति येची करावी,
झडकरि उगली हे शांतिकांता वरावी. ॥ ८३ ॥

अनुभविशि शरीरीं यातना या उदंडा,
तदपि अझुणि तूला होत नाहीं उगंडा ।
घडिघडि युवतींच्या गुंतशी स्नेहपाशीं;
विषयविरति नाहीं सर्वथा तूजपाशीं. ॥ ८४ ॥

निशिदिनि परनिंदा स्वाद घेतां न राहे,
क्षणभरि हरिनामसाचें जीला न साहे, ।
अतिमधुर रसें हे सर्वदा तृप्त केली,
तदपि मज रसज्ञा काय उत्तीर्ण जाली ? ॥ ८५ ॥

अनिश परकलत्रालोकनाभ्यास ज्यांला,
हरिचरणदिदृक्षा काय हे होय त्याला ? ।
म्हणुन घडिघडी हे लोचने आवरावीं,
हरिचरणचरित्रें अंतरीं हीं स्मरावीं. ॥ ८६ ॥

क्षण परिचय झाल्या जन्मजन्मीं सुटेना,
परम विषम काळीं सोयरा जो विटेना, ।

त्यजुनि विषयधंदा सद्गुरूच्या नियोगें.
सगुणभजनमार्गी लाग सत्संगयोगें. ।
जंव जंव तुजमध्यें चित्स्वरूप प्रकाशे,
तव तंव अवघें हें गाढ मोहांध नासे. ॥ ९५ ॥
विषयविषममार्गी चालतां क्लेश होती,
पदर धरुनि ओढी हे जगन्मुक्तिदूती. ।
हरिचरणसरोजीं क्षेत्रसन्यास घ्यावा,
तरिच मग न व्हावी हे पराङ्मुख जीवा. ॥ ९६ ॥
निरुपम ममतेची लागली दाट झाडी,
त्वरित बहुत आतां पाय येथून काढीं. ।
यदुपतिपदवी हे चुकल्या तों न चाले;
सहजच तुज साही आडवे शत्रु आले. ॥ ९७ ॥
अजुणि तरि विवेकें तूं विचारुनि पाहीं
गुरुविण तुजला हा सर्वथा मार्ग नाहीं. ।
सहज तुज यशोदापुत्र हा सांपडावा
कवण अपरजन्मीं योग ऐसा घडावा! ॥ ९८ ॥
क्षणभरि परि याचे पाय आतां न सोडीं,
त्वरित गुरुपणाची लावि यासीच गोडी. ।
बहुतच तुज जें कीं वाटती, रे, अशक्यें;
सहज समजती तें तत्त्वमस्यादिवाक्यें. ॥ ९९ ॥
गोकुळीं प्रकटली द्युति सांवळी,
गोधनें द्रुमतळीं सहसा वळी; ।
जे सनातन जगत्त्रय सावली;
तत्पदीं हृदयवृत्ति विसांवली. ॥ १०० ॥
द्वारकापतिपदांबुजमार्गी
लागलें मन, विटे अपवर्गी. ।
वासुदेव मज कौस्तुभधारी
आठवे नलिननाभ मुरारी. ॥ १०१ ॥
जो श्रुतींसही अयोनिज वाचे
तो सदैव तुज यो निजवाचे. ।

९ ८ चरणपद्म जयाचें
जाण धाम विश्वोर्मिजयाचें. ॥ १०२ ॥
जो परात्पर अगोचर वेदां,
नातुडेच हरि जो मतभेदां, ॥
गोपवेष मुरलीधर ज्याचा,
तोच त्या मुखिं अहर्निश गावा. ॥ १०३ ॥
जो नसोनही असे परि साचा,
जाण जो परिसही परिसाचा. ।
नायकनायक जया कर जोडी,
मानसा, करि तयाचिच जोडी. ॥ १०४ ॥

कृष्णमूर्ति हृदयीं जडलीसे, । तत्पदां दृढ मिठी पडलीसे, ॥
विश्व हें सकळ तन्मय जालें, । द्वैतभान अवघेंच उडालें. ॥ १०५ ॥
माय, बाप, कुळगोत, विसावा, । सोयरा, सजण हाच असावा. ॥
अंतरंग तुज याहुन नाहीं, । हें मना हित विचारुन पाहीं. ॥ १०६ ॥
कृष्ण, केशव, जनार्दन, नामें । घेत जाय करितां निज कामें. ॥
वासुदेव, घननीळ पुकाचा । सांपडे, निधि अनादिपुरुषाचा. ॥ १०७ ॥
हा भवाब्धि मजला न उल्घे, । बुडितां विषय मानस लघे. ॥
सावळा, सगुण, जो अवतारी, । कर्णधार उतरील उतारीं. ॥ १०८ ॥
सोयरे सकळ, सादर, मित्रें, । व्यर्थ जाण अनुकूल कलत्रें, ॥
चित्त हें नलगतां भगवंतीं । सोडवी कवण येउन अंतीं! ॥ १०९ ॥
ज्ञानराज मजला गुरु भेटे, । शोकसागर समग्रहि आटे. ॥
नित्य ओहट पडे ममतेला । ठाव होय चढतां समतेला. ॥ ११० ॥
हा भव मज भवज्वर आला, । ज्ञानराज मज वैद्य मिळाला. ॥
मी उदास विषयांवरि जालों, । सद्गुरु, शरण तुजच आलों ॥ १११ ॥
व्यापिलें मज मनोभवरोगें, । जाचलों विषयसंचययोगें. ॥
पादुकाभजनभेषज द्यावें, । सद्गुरु, मज अलौकिक व्हावें. ॥ ११२ ॥
ओघ येथ तुझिया स्तवनाचे, । भारती बहुत यास्तव नाचे. ॥
वेग जाय मुरडोन मनाचा, । नित्य उत्सव तुझ्या नमनाचा. ॥ ११३ ॥
भाळलों धनमदें, जगदीशा, । नाठवेचि मज, गोपविलासा. ॥
वेदवेद्यचरिता, भगवंता । येइं मी शरण तुज, अनंता. ॥ ११४ ॥

पुत्रमित्रपशुबांधवमोहे । नित्य संसृतिसुखांतचि पोहे. ॥
नाठवे चरणपंकज तुझें, । सोडवी कवण बंधन माझें ? ॥ ११५ ॥
शॉवर्णीच मदनानल आहे, । रक्षिता कवण आणिक आहे ? ॥
मत्सरें हुरपळे मन माझें, । याश जीवन पदोदक तुझें. ॥ ११६ ॥
मोहमंदें भुरळे मज घाली, । वृत्ति हे तुज पराङ्मुख झाली. ॥
घातला दृढ गुणत्रयफांसा, । त्वविणीं हरि किती मज झांसा ? ॥ ११७ ॥
कृष्णजी, परमदीन दयाळा, । पावना, पतितपावनशीला, ॥
सोयऱ्या, मुसलया, रण सोडीं. । येक वेळ मज येथुनि सोडीं. ॥ ११८ ॥
आयके द्विज अजामिळ नांवें, । ज्याजला पतितराज म्हणावें, ॥
उद्धरे निधि अनाचरणाचा, । हा प्रताप तुझिया चरणांचा. ॥ ११९ ॥
रूप हें सहज सुंदर तुझें । नोळखे हृदय पामर माझें. ।
हें निरर्थक भरे बहु हावें; । या अनित्य विषयांवरि धावे. ॥ १२० ॥
कोटि जन्म जपतां तुजला, रे, । लाधली अवचिता मजला, रे. ॥
सांपडेल निज संचित ठेवा, । कोण यावरि विसंबिल देवा ? ॥ १२१ ॥
निद्रितास मज जागृत केलें, । हातिंचें सकल संचित नेलें. ॥
तोडिलें सकल बंधन, बापा, । कोण हे हरि तुझी अनुकंपा ! ॥ १२२ ॥
खेळ हा सकल मोडुन नेला, । थोर तां मज अनुग्रह केला; ॥
दावर्णाहुनि सुटे पशु जैसा । होय मी सहज मुक्तच तैसा. ॥ १२३ ॥
नित्य संसृतिमये सुखदुःखें । देखिलीं विविधरूप अनेकें. ॥
सोडवीं त्वरित, यादवराजा. । गुंतली कवणिया निजकाजा ? ॥ १२४ ॥
तुजवीण मन पांगुळ जालें, । आंधळेपण मतीसही आलें. ॥
ऊचलून कडिये मज घेईं, । कृष्णरूपजननी स्तन देईं. ॥ १२५ ॥
तू असोनि जननी कनवाळू, । मी तुझें परमबाळ भुकाळू, ॥
काय होय अति वो रस तुझा, । प्राण जाय तुजवांचुन माझा. ॥ १२६ ॥
मी विपण्ण विलपें परदेशीं, । तू कसें मज अनुत्तर देशी ? ॥
वत्सले, त्यजुनि बाळक तान्हा । काय हा पळविशी निजपान्हा ? ॥ १२७ ॥
बाळकें रुसतसे जननीसीं, । काय माय रुसते परि त्यासीं ? ॥
वासुरा तजुन गाय खडाणी । काय जाय पशुजाति अडाणी ? ॥ १२८ ॥
श्वापदांत भयभीत वराकी । काय हे हरिणि पाडस टाकी ? ॥
चारया जरि विहंगिणि जाते, । ते फिरोन पिलियांप्रति येते. ॥ १२९ ॥

कोरडे मुख पडे बहु मातें । न द्रवे अजुनि मानस नूतें. ॥
म्या किती तरि हरी विनवावें ? । कोण काळ तरि तारिल पार. ॥ १३० ॥
कठ हा गद्गदिसें बहु दाटे. । लागि सत्वर मला निज वाटे. ॥
पथ हा जरि तुझा उमगावा, । पाश हा तरिच, रे, उगवावा. ॥ १३१ ॥
हा हरिस्तव पढे जन जो रीं, । तो कृतार्थ म्हणवी नर थोरी. ॥
प्रेमपात्र हरिचें बहु व्हावा; । ससृतिश्रम तयास न व्हावा. ॥ १३२ ॥

बहुविध महाशासें ऐसें मनाप्रति बोलतां,
स्मरणहि शरीराचें ज्याला नसे पण चालता, ।
तदपि करुणासिंधू पथा स्वकीय न टाकवी,
जळनिधिमहासीमेमध्यें हळू हळु पाववी. ॥ १३३ ॥
नयनकमळें विप्राचीं ते क्षणेंच न्यहाळिती
कळस कनकप्रासादाचे जडीत झळाळिती. ।
तदुपरि महा आलीं नामें तदीय मुखाबुजा.
जय जय कृपासिंधो, बंधो मदीय, अधोक्षजा. ॥ १३४ ॥
यदुपतिपुरी विप्रातें ते दिसों जव लागली,
म्हणति भगवद्भक्तें तेव्हां असे मग घातली. ।
सजल नयनें झालीं, प्रेमें गळा बहु दाटला,
अतिशयित हा रोमांचाचा समूहही थाटला. ॥ १३५ ॥
कथा हे कृष्णाची सकल जगदानंदजननी.
मनोभाव ईचें श्रवण करिजे नित्य सुजनीं ।
प्रसगें श्रोत्याचे सकलही महादोष हरती;
यदूत्तमप्रेमें विषयरसगोडी विसरती. ॥ १३६ ॥

इति श्रीमद्भगवद्भक्तपदानुरक्तकविसामराजविरचिते रुक्मिणी-
हरणकाव्ये द्वारकादर्शनो नाम चतुर्थः सर्गः

---

## सर्ग पांचवा.

महापुण्यें राहे जलधिजठरीं हेमनगरी,
धरी जे सद्भावें त्रिभुवननिधानास उदरीं;।
तिच्या द्वारा आला द्विजवर महासंभ्रमभरें,
कपाटें रत्नांचीं विलसति जयेलागिं रुचिरें. ॥ १ ॥

फेरा जिचा द्वादश योजनांचा, । आधार जे केवळ सज्जनांचा, ।
प्राकार जे सात धरीत आहे, । क्षणेक हा तीजकडेच पाहे. ॥ २ ॥
जे देखिली केवळ कांचनाची । कृतार्थता होय विलोचनांची. ॥
प्रवेशही ते नगरींत केला; । जन्मांतरींचा श्रम सर्व गेला. ॥ ३ ॥
असे तयां सत पुर्यासमाना; । उत्कृष्ट सर्वांहुनि ईस माना. ॥
प्रत्यक्ष जेथें भगवंत नांदे, । सौभाग्य हे याहुनि काय लाधे? ॥ ४ ॥
वाहे जिचा उत्कट धाक लंका, । धरीत आहे अलका कलंका, ॥
जे लाजवीते अमरावतीला, । हा आदरी यादवराय तीला. ॥ ५ ॥
जेथें निधींच्या करिजेत पोती, । कल्पद्रुमांची तरि होय खोती, ॥
घरोघरीं पाळिति कामधेनू, । संपत्ति हे याहुनि काय वानूं? ॥ ६ ॥
लोटांगणीं येति महासमृद्धि, । लोळेति दारीं अणिमादि सिद्धि. ॥
पावोनि अत्युत्कट संपदा या । चुकेतना जे निजसंप्रदाया. ॥ ७ ॥
विदोविदीं लोटती तें प्रवाळें; । खेळेत मुक्तागण विप्रबाळें. ॥
जेथे नसे आदर माणिकांचा, । विचार कैंचा मग आणिकांचा? ॥ ८ ॥
पाहोनि नानाविध आपणांतें । कृतार्थ मानी द्विज आपणातें. ॥
चहूंकडे केवळ जातरूपें; । कदापि दृष्टी न पडेच रूपें. ॥ ९ ॥
संपन्न चिंतामणिसंदुकांनीं । बसेत सौदागर ते दुकानां. ॥
अधिष्ठितां तत्पुरतां सभ्यांला, । अनेक मुक्ताफळघोंस ज्यांला. ॥ १० ॥
वाजेत हे ताल मृदंग वीणा; । नाचेत त्या नृत्यकलाप्रवीणा. ॥
सवाल कृष्णांघ्रिसरोरुहांचा, । करीत तच्चित्रचरित्र चर्चा. ॥ ११ ॥
वाद्यांविहीं नामभरें अटाळ्या, । पौरांगना वाजवितात टाळ्या. ॥
घरोघरीं उत्सव केशवाचा । गोविंद, दामोदर, हेच वाचा. ॥ १२ ॥
संमर्द जेथें भगवत्कथांचे, । जे हे समुत्पादक सत्पथांचे. ॥
उठेत नाना ध्वनि आरत्यांचे, । कळेत ना पार अपार त्यांचे. ॥ १३ ॥

संवाद होती शुकसारिकांचे । अखंड वेदांतिक कारिकांचे. ॥
ठेवूनियां मस्तक योषिदंकीं । कपोत हुंकार करी विटंकीं. ॥

द्विज नगर पहातां भ्रांत होवोनि गेला,
चुकत चुकत दैवें राजचौकांत आला. ।
सभय यदुपतीच्या पावला द्वारपाळीं,
हरिजवळि जयाला नेइजे द्वारपाळीं. ॥ १५ ॥

निरुपम तव देखे बाग, पीयूषवापी,
हरिगुण पिक गाती, नाचती ते कलापी, ।
सहजच ऋतु साही होति येकत्र गोळा,
कधिहि न समजे हा पाउसाळा, उन्हाळा. ॥ १६ ॥

तरी असे अंगणभू नृपाची, । वसेत जेथें अति स्वच्छ पाचा. ॥
उठेत जेथे जलयंत्रधारा, । देवांगना नाचति निर्विकारा. ॥ १७ ॥
गंधर्व जेथें करितात गानें, । स्वर्लोकवासी धरिती विमानें, ॥
मेळा मिळे उत्कट किन्नरांचा, । करी महा आदर तो नरांचा. ॥ १८ ॥
झुलेत ऐरावतकोटि जेथें, । उच्चैःश्रवे काय नसेत तेथें? ॥
स्थळीं स्थळीं युद्ध करीत जेठी, । नरेंद्रही घेउनि येति भेटा. ॥ १९ ॥
चहूंकडे रत्नजडीत भोंतीं, । गोपानसीला अगणीत मोतीं. ॥
अशी असे राजसभा विशाला; । चंद्रावही स्पर्धति चंद्रशाला. ॥ २० ॥
वातायनें शोभति इंद्रनीलीं, । दिगंतरें भासति सर्व नीळीं. ॥
तशा हिऱ्यांच्या घडिवा चिऱ्यांच्या । परंपरा शोभति पायऱ्यांच्या ॥ २१ ॥

तदुपरि जंव वेंघे विप्र सोपानपंक्ती,
झडकरि तंव चारी आडव्या येति मुक्ती, ।
ढकलुनि परत्या त्या, तो पुढें चालतसे.
हरिचरणसरोजीं जीव हा ठेविलासे. ॥ २२ ॥

जय, विजय उभे हे त्या सभाद्वारदेशीं,
म्हणति, 'कवण येतो हा भिकारी विदेशी.' ।
क्षणभरि परि कांहीं त्याकडेही न पाहे;
मुनिजनहृदयाचें लक्ष्य लक्षीत आहे. ॥ २३ ॥

सिंहासनीं श्यामल तेज भासे । देखोन जे याग निगूढ हासे. ॥
द्विजागमाचा हरि हेतु जाणे । अक्रूरहस्तावरि हस्त ठाणे. ॥ २४ ॥
सुरासुरांची मग दाटि देखे; । पदप्रणामीं बहु होति वाखे, ॥
येतां किरीटांवरि वेत्रयष्टी । तथापि शौरी न पडेच दृष्टी. ॥ २५ ॥
स्वर्लोकलोकाधिप वज्रपाणी । राहे उभा घेऊनि तत्कृपाणी; ॥
तसाच तेथें यम दंडधारी । यथोचितस्थाननिदेशकारी; ॥ २६ ॥
आणीतसे तो मग पाशपाणी । कृष्णास गङ्गूषविधीस पाणी; ॥
उपायनें घेय मनुष्यधर्मी । कदा चुकेनाच मनुष्यधर्मा; ॥ २७ ॥
कृशानु तांबूलकरंक वाहे; । पतद्गृहीं नैर्ऋत घेत आहे; ॥
हा वायु जेथें व्यजनास वागे; । ईशान हा राजसभाधिकारी; ॥ २८ ॥
सहस्रपत्र स्फुट होय जैसें । कलाधर च्छत्र धरीच तैसें. ॥
जे सात्वकी उद्धव भक्त भारी, । ते चामरें वारिति निर्विकारी. ॥ २९ ॥
दरांत ज्या इंद्रकिरीटशोभा । त्या पादुकांचा गरुडास लोभा. ॥
गणेश ये रत्नजडीत आसा । उभा असे शंकित जो उदासा. ॥ ३० ॥
अमात्यचूडामणि हे हरीचे, । जे येक रत्नाकर चातुरीचे. ॥
चहूंकडे सर्व उभे रहाती, । तटस्थ गोविंद पदें पहाती. ॥ ३१ ॥
विलक्षणा तेथिल राजरीती, । देवांसही मानव नादरीती! ॥
हा विप्र येणें अति भीति वाहे, । मधें मधें थोकत येत आहे. ॥ ३२ ॥
कृष्णास दृग्गोचर विप्र झाला; । तत्काल सारे उतरोन आला. ॥
सस्नेह वत्साप्रति गाय धांवे, । तसाच भक्तांप्रति देव धांवे. ॥ ३३ ॥
पीतांबराचा बहु घोळ लोळे; । आकर्णपर्यंत विशाल डोळे; ॥
आपाद कंठीं वनमाळ वाली; । ते सांवळी सन्मुख मूर्ति आली. ॥ ३४ ॥
द्विजास तेव्हां न सुचेच कांहीं । पडे महानंदरसप्रवाहीं; ॥
स्तवी चतुर्वक्त्र जयास वंदी । तो कृष्ण त्याचे मग पाय वंदी. ॥ ३५ ॥
अर्धासनीं आणुनि बैसवीला, । यथाविधीनें मधुपर्क केला. ॥
ब्रह्मादिकां जो हरि येचकेना, । तो आजि याच्या उचिता चुकेना. ॥ ३६ ॥
अपूर्व वाटे सनकादिकांला, । तसें वसिष्ठादिक वैदिकांला. ॥
एतत्कृपागर्व महा वहाती, । परस्परें ते वदनें पहाती. ॥ ३७ ॥

सुदेव नामा द्विज माज सोडा, । तें भीमकाचें मग पत्र काढी ॥
म्हणे तया श्रीहरि, ' राहवाना, । क्षणातरी हें मन दासवानें. ' ॥ ३८ ॥

द्विज परम शहाणा हा महा बोलणारा,
परि निपट निघेना त्या पुढें बोल काहीं. ।
घडिघडि जिभ जेथें चावळे वाक्पतीची,
खदखदल न चाले सर्वथा दिग्गजांचा ॥ ३९ ॥

चतुर्याम मग सायंकाळिचा तास वाजे,
विविध रुचिरसान्नपान गंभीर गाजे ।
अगणित मग येता दीपधारा, दिवाळी,
यदुपतिनमना दे पंक्ति ज्याची वखाणी ॥ ४० ॥

स्खुल जवळि आला हे सनुथानबेळा
म्हणउनि निकट हा पण्मुख अन देला ।
यदुपति उठता हे परि होऊ निघाला,
तदनि किंकिणीच्या दारिं अत्यंत झाली. ॥ ४१ ॥

कपति परम जेथ अगद अगदार्शी,
अपरमित तथा हे आयुध आयुधाशी ।
विलुठति पदपीठीं देव कोटीकुपोटी,
अहमहमिकतेनें धावता वीर कोटी ॥ ४२ ॥

क्षणभर तंव तेथें विप्र सावक पाहे,
झटकरि कर त्याचा सात्यकी घेत आहे ।
तदुपरि अवरोधद्वार किंचिद्विलम्बें,
यदुपति मग पाहे पावहस्तावलंबें ॥ ४३ ॥

दारार्इ हे अनुसरेत तया नृपात । समाविल मग यथोचित दृष्टिपातें. ।
अथ पुर अंतरता मधुकैटभारी, । सर्वांमहा अति निषेवीत नेत्रधारी । ४४ ॥

सध्यामंडपमार्ग दावित असे मुख्य प्रतीहारिका
' यार, श्रीहरि ! कृष्ण ! यादवपते ! ' हे बोलती सारिका. ।
सध्यावंदन आदरें करुनि जो गेला असे भोजना,
विप्राचा तंव नारद हलुच ते वेश असे सूचना ॥ ४५ ॥

तदनंतर जगदीशें विप्र तो आणवीला,
अति सुरभि फुलेलें आदरें न्हाणवीला, ।
तदुपर रुचिर त्यासी उंच हा नेसवीला,
मांचनर मग पदीं आपुले बैसवीला. ॥ ४६ ॥

तदुपरि मग पंक्ती बैसती यादवांच्या,
द्विजपरिणत जेथें बोल्ती वेदवाचा. ।
फिरति बहुत तेथें देवदासीसहस्रें,
सहजच निजतेजें वारिती जे तमिस्रें. ॥ ४७ ॥

कितिक मग वसाया देति या हेमपीठें,
कितियक मग तेथें मांडिती रत्नताटें, ।
कितियक वरळा या लाविती दीपमाळा,
कितियक मग तेथें वाढिती त्या सुनीला. ॥ ४८ ॥

हलधर हरि दोघे बैसती येक ताटीं,
त्वरित बहुत आली माय हे त्यांजसाठीं; ।
सकळ युवतिमान्या देवकी देवमाता,
पुनरपि निजहस्तें वाढिते जे अनंता. ॥ ४९ ॥

क्षणभरि मग दासा येति त्या राजदारा,
अति रुचिर पदार्था वाढिती ज्या उदारा. ।
हळुहळु सकळांचीं भोजनें सांग होतीं,
कनकघटित तस्तें दासिका आणवीती. ॥ ५० ॥

सुरभिसलिल देती कस्तुरी आंचवाया,
स्थविर तदपि लागे मृत्तिका चाचपाया. ।
अभिनव नवलें या हांसती देवदासी,
हळुच मग दवावी ते दयोर्गाण त्यांसी. ॥ ५१ ॥

अति रुचिर विड्यांची प्राप्ति सर्वास झाली,
द्विजपतिस अनुज्ञा उद्धवें देववीली. ।
यदुपतिजनकाची जे असे होमशाळा,
क्षणभर मग तेथें स्वाप जाऊन केला. ॥ ५२ ॥

निजेल्याही रामायण आणि महाभारत पढे,
मधेमध्यें नामस्मरणमहिमा त्यावरि चढे. ।
महाध्यानाभ्यासीं स्थगित मग राहे क्षणभरी,
मनामध्यें येती हरिपदसुधांभोधिलहरी. ॥ ५३ ॥
भरें हा निद्रेच्या द्विजपति निजेला जंव असे,
त्वरेंहीं हा येऊन प्रभुवर तया संनिध बसे. ।
मनस्वी, विश्वात्मा, भुवनपति, विश्वंभर, हरी,
निजांचा भक्तांचा द्विजचरणसंवाहन करी! ॥ ५४ ॥
करस्पर्शें याच्या द्विजतिलक तत्काल उठिला,
म्हणे "हा श्रीकृष्णा परम मज अन्याय घडला! " ।
पदीं माथा ठेवी; झडकरि करें तत्कर धरी,
"प्रकार स्वामी हा सकल परलोकास अधरी. ॥ ५५ ॥
घडे हे प्रत्यक्ष प्रकटच तुझें दर्शन मला,
नसे कांहीं माझा तदपि असदुद्योग शमला; ।
रहातां ही पाहे सुरपतितरूच्या तळवटीं,
जसा भिक्षेसाठीं निशिदिस करटा कटकटी! ॥ ५६ ॥
प्रयासें सत्तायीं निजविषयगुते उगविती,
गुणीं तुझ्या ते तों सहजच सुखें गुंतति यती. ।
अहंबुद्धिस्पर्शें प्रकटन जया वाळित पडे,
तया त्वत्तत्त्वाचें अढळ वसणें कोठुनि घडे? ॥ ५७ ॥
निजानंदें जें कीं स्थळ परमहंसां विचरणें,
कदा जेथें नाहीं नियत निजकर्में निचरणें. ।
तया ठायां जाया हृदय बहुधा तातडि करी,
जगन्नाथा, आतां क्षणभरि पहा धीर न धरी. ॥ ५८ ॥
वृथा मायाजाळीं पडुन मन हें धावति करी,
दुराशेनें गुते अद्यनि विषयीं वीट न धरी. ।
विवेकाच्या मूळें निजनिलयकारागृह सुटे,
ठसा वैराग्याचा तरिच हृदयामाजि उमटे. ॥ ५९ ॥

मनामध्यें माझ्या विषयविरस प्रकटला,
    फलाशेनें जीवाभिधविहग जेथें लिपटला, ।
निराशेनें जेथें शुक, सनक शेषादि सदा,
    यदूत्तंसा, आतां झडकरि तया दाखवि पदा. ॥ ६० ॥
पदस्पर्शे तूझ्या दुरितचयपाथोनिधि जळे,
    क्षणार्धें श्रीकृष्णा, सुकृतमय कल्पद्रुम फळे. ।
भवद्बोधाचा हा अनुभव सदा होय मजला,
    अहो मूढत्वानें अजुनि पुसणें काय तुजला ? ॥ ६१ ॥
अहो, या लोहाचा जिनस परिसेंशीं जरि मिळे,
    तयाच्या संसर्गें अखिल मग लोहत्व उधळे. ।
अकस्मात स्वामी, सकलहि अहंकार निरसे,
    पदस्पर्शे तूझ्या सहज मजला भीषण नसे." ॥ ६२ ॥
सदा सद्भावाचा अतिशयित भोक्ता हरि असे,
    मनामध्यें ज्याच्या स्वपरजनवैषम्य न वसे. ।
महा प्रेमें त्यासी तदुपरि जगन्नायक वदे,
    जयाचें भक्तांला मन यदुपतीचें बहु वधे. ॥ ६३ ॥
"चहूंमध्यें मुख्य प्रकटच गृहस्थाश्रम असे,
    असें विश्रांतीचें निलय दुसरें आणिक नसे. ।
प्रसंगें हे तेथें अतिथिपरिचर्या जरि घडे,
    समारंभें अंतीं सुरपतिपुरद्वार उघडे. ॥ ६४ ॥
महादोषी मूढप्रवरखर विप्रब्रुव असे,
    जया दुष्टा मात्रों निगट कधिंही चाडच नसे, ।
तयाही विप्राचा अनुचित असत्कार करणें,
    जयाच्या सक्षोभें निजपतन कैसें न घडणें ? ॥ ६५ ॥
निजद्रोहार्थीचा कण जरि पडे किंचित मना,
    तयाच्या संसर्गें उठति भडके वंशविपिनीं; ।
महांधाचे दृष्टी प्रकटहि महा दोष न दिसे,
    पहातां तों याचें फळ तुरत हातावरि असे. ॥ ६६ ॥

यदृच्छालाभें जे द्विज मुदित युष्मद्विध सदा,
तयांच्या पायांचा परिचय सुटेना मज कदा ।
भृगूची हे लत्ता विमल हृदयीं नित्य मिरवा,
इच्या लाभें लक्ष्मीप्रणयरस जीवा विसरवा. ॥ ६७ ॥
प्रसादें ज्यांच्या मी यदुपति जगन्नायक असे,
असे हे निवाहें अद्युणि समजेना जग कसें ? ।
मदीया भक्ताचा अपसद तिरस्कार करिता,
अहो, ते दुष्टात्मे नियत मजशीं वैर धरिती. ॥ ६८ ॥
भल्यांच्या सतोषें निरतिशय माझें मन निवे,
तयांच्या या दुःखें नियत बहुधा जीव दुखवे. ।
तया भक्तांसाठीं विविध अवतारास धरणं,
तदुद्देशें ऐसा विरस मज संसार करणें ॥ ६९ ॥
पद्म माझे नाभीकमलिंहुनि वेधे उपजती,
अनंतब्रह्माडें उदरकुहरीं हे कुहिजती, ।
द्विजाची मर्यादा तदपि अवहेळूच न शकू,
अहो, तेथें इंद्रप्रभृति विबुधें कोण मशक ? ॥ ७० ॥
अहो, जेथ माझें स्तवन करितां वेद अडती,
शिरोभागा माझे अपरिमित संदेह पडती ।
गुणोत्कर्षे माझ्या निपटच धरी शेष लघिमा,
तया जाला पाहें अविषय मला भक्तमहिमा ॥ ७१ ॥
अहो, सद्भक्तांचा परम मज दुष्काळ पडला,
अशामध्यें तूझा अवचट मला लाभ घडला ! ।
द्विजा तूझें आहे अनिश अनुसंधान मजशीं,
घडे कैसा तेथें क्षणभरि तरी भेद तुजशीं ? ॥ ७२ ॥
सदा सद्वांछेचें हृदयविवरीं बीज उगवे,
अहो, मद्भक्तीचा तरिच नरवा कोंब उगवे ।
विवेकाचे पाले सहज फुटती कोमल नवे,
मनाचें पूर्णत्वा अभिनव कसा उत्सव नव्हे ? ॥ ७३ ॥

क्रमप्राप्तीनें हे वदुपरि फुले चांवि लतिका,
अशें हें विश्रांतिस्थल परम जें जीवनयिका. ।
निजानंदामोदें सकल सुखदुःखादि विसरे,
पहातां अद्वैतामृतरत्न रसोद्रेक पसरे ॥ ७४ ॥

प्रपंचीं हें माझें भजन जरि कांहीं (क्षण) पडे,
महा दोषी तोही निरट अडवाटेस न पडे; ।
प्रतिज्ञा माझी हे नियत समजावी बुध जनीं,
धरावा निर्वाहें अनवरत विश्वास भजनीं. ॥ ७५ ॥

अहो जों जों जीवा सगुण भजनाचें पुट चढे,
अनेका जन्मांचा तंव तंव मनाचा मळ झडे. ।
स्वभावें मत्याचें तदुपरि कसोटीस उतरे,
क्रमप्राप्तीनें हें ननरण मनाचें मग नुरे. ॥ ७६ ॥

भवाभोधीमध्यें विरपलय आनाम पसरे,
तयाच्या मसंगें निजहितमनोर्मीन विसरे. ।
पहातां या दोघां अणु जियचिया भेद नसतां,
स्वबुद्धीनें कल्पी हतमति दुजा भाव नसतां ! ॥ ७७ ॥

मतें वेदांताच्या समज निजससार लटिका,
करी कोणाची हे कवण लटकी आजि सुटका ? ।
पहातां बंधाचें सहज समजे मूळच नसे,
मुमुक्षा तेथें हे गगनकुसुमाकार विलसे. ॥ ७८ ॥

समस्तां शास्त्राचें मथित कथितों सार तुजला,
नको आतां टाकूं क्षणभर मनांतून मजला. ।
कराया हे सेवा समुचित तुझी सिद्धच असें,
अभिज्ञा, विप्रेंद्रा, प्रकृत तुजला यावरि पुसें. ॥ ७९ ॥

समुद्रामध्यें हें स्थळ तरि महा दुर्गम असे,
तुम्हा लोकांचा तो अर्णवरि संचारच नसे; ।
किमर्थं स्वामी, हा श्रमित बहु आत्मा श्रमविला ?
कळो द्यावें याचें झडकरि तुम्हीं कारण मला." ॥ ८० ॥

येईल हें कुशल जाणुन लेख काला,
   आज्ञापिजे निजमहोत्सवलेखनाला. ।
हें लीहिले प्रकृत केवळ संप्रदायें,
   मानूं नये परि यथार्थचि देवरायें. ॥ ८८ ॥
त्रिशासना परिस यादववंशदीपा,
   योगींद्रहृत्कमलपंजरगर्भदीपा, ।
हा ताप ये त्वरित आजि उठोन माझ्या,
   याता मला श्रवणगोचर होति तुझ्या. ॥ ८९ ॥
माझा मनोमधुप लुब्ध बहूत झाला,
   तूझे पदांबुजयुगीं रहिवास केला. ।
कारुण्य वहुत याजनिमित्त येतें,
   कृष्णा, तुझे चरणपल्लव हे धरीतें. ॥ ९० ॥
जे आयकेत भवदीय गुणौघ कानीं
   त्यांचे निघोनि उगले मग ताप तीन्ही. ।
जे पाहती अति मनोहर रूप देवा,
   त्यां डोळसां अखिल लाभ अपूर्व व्हावा. ॥ ९१ ॥
जन्मास या तुज निमित्तचि जाण आलें,
   आईकतां गुण तुझे सजणा, न धालें. ।
हे अच्युता, मन मला नकळेच तूझें,
   तूझे पदीं परि अपत्रप चित्त माझें. ॥ ९२ ॥
सर्वां गुणीं तुजसमान महा वदान्या,
   ते कोण तूज नवरी नवरील धन्या ! ।
विद्यावयद्रविणरूपगुणौघधामा,
   कृष्णा, नृसिंहनरलोकमनोभिरामा. ॥ ९३ ॥
याकारणें नियत म्यां वरिलास भावें,
   येऊनियां त्वरित त्वां मज आजि न्यावें. ।
हा लागला जिव असे तुजवीण जाया,

विज्ञापना शपथपूर्वक तूज केली,
येथील तों सकळरीति कळोनि गेली. ।
आणीक काय निपुणामति म्यां लिहावें,
त्वां एक वेळ सगुणा इकडे पहावें. ॥ १०२ ॥
नारायणा, निखिलवृष्णिपते, मुकुंदा,
टाकून दे मज निमित्त समस्त धंदा ।
दासी तुझी परम लालस वाट पाहे,
तूझे त्वरेंत बहु यावरि मोल आहे. ॥ १०३ ॥
हेंजीव हे ज्ञोभनि जाण माझी,
येथें नसो किमपि विमतिराणि तूझी. ।
पत्रांत लिहिलें अवशिष्ट असेल कांहीं,
याच्या मुखें विदित होइल तूज तें हो." ॥ १०४ ॥
हें भीमकीपत्र समाप्त झालें. । कृष्णास कांहींयक हास्य आलें. ॥
जाणोनि हा आदर माधवाचा । वदे प्रसंगोचित विप्र वाचा. ॥ १०५ ॥
चतुर्भुजा, नीरदनीलवर्णा, । परात्परा, यदुकुलावतीर्णा, ॥
विशेष हा आइक शेषचारें । करीस लोकत्रयशासनाहीं. ॥ १०६ ॥
ते भीमकी पंकजपत्रनेत्रा, । कृशोदरी पूर्णसुधांशुवक्त्रा, ॥
उत्फुल्ल आरक्त सरोजहातें । जे लाजवीते करभोरु हातें. ॥ १०७ ॥
जो हा न पावे समता नखाची । तो काय पावे उपमा मुखाची ! ॥
नखप्रभेनें विधु हा उटावा । तरीच हो निर्मल ऊमटावा. ॥ १०८ ॥
असेत हे सुंदर केश काळे, । विशाल तीचे विलसेत डोळे; ॥
जयांपुढें खंजन खंज झाले । प्रत्यक्ष हे मीन जळीं लपाले. ॥ १०९ ॥
तीची असे सज्ज कपाळपाटी; । सौभाग्यरेखा उमटे ललाटीं, ॥
ज्या भ्रूलता श्यामल शोभमाना । त्या कामकोदंडसमान माना; ॥ ११० ॥
अत्यंत हे स्वच्छ कपोल दोन्ही; । सुवर्णशुक्तिभ्रम होय कानीं; ॥
नासा तिची हे उपमा न साहे, । तिलप्रसूनाहुन नीट आहे. ॥ १११ ॥
आली तरी त्या अधरास लाली, । लज्जा प्रवाळांस विशेष झाली. ॥
त्या पक्व हो दाडिमबीजराजी । दंतावलीदास्यविधीस राजी. ॥ ११२ ॥

असे गळा मंजुळ हा निसर्गें, । तथापि तीचीं वचनें महर्घें. ॥
तीच्या स्मितांचें जंर तेज फाके । देणेंहि त्याचें मग ओज झाके. ॥ ११३ ॥
न ये मृणालां मृदुता भुजांची, । कन्या महासुंदर भूभुजांची. ॥
अत्यंत शोभा कुचकुड्मलांची । विलासभू त्र्यंबयनोत्पलांची. ॥ ११४ ॥
नाभीन्हदीं या मदनास थारा. । रोमावली तनरवारधारा. ॥
तीच्या नितंबास गुरुत्व साजे; । माजे जिच्या सिंहसमाज लाजे. ॥ ११५ ॥
दृष्टांत तीच्या जघनास नाहीं, । तथापि भासे मज येक कांहीं. ॥
साम्राज्य जेव्हां मदनास आलें, । सुवर्णसिंहासन सिद्ध केलें, ॥ ११६ ॥
असेत त्या मांसल फार ऊरु; । जानुद्वयं सुंदर फार भीरु. ॥
त्या पोटऱ्यांची रुचिर प्रभा ते । कीं मन्मथाचे विलसेत भाते. ॥ ११७ ॥
ते पाय तीचे नवपल्लवांनीं । समानसे, मानव कोण वानी ? ।
औदार्य जे नित्य धरीत मोटें । कल्पद्रुमाचें यश होय खोटें. ॥ ११८ ॥
नसे बहू पातळ आणि मोठी, । देवांगनांच्या नुपमेति कोटी. ।
नसे बहू उंच तशीच खुजी; । प्रत्यक्ष लक्ष्मीप्रतिमाच दूजी. ॥ ११९ ॥
नसे मनातून कदापि खोटी; । खोट्या करी तस सुवर्णकोटी. ।
गंगाप्रवाहोपम शील जीचें, । पवित्रआचरणंन काय तीचें ? ॥ १२० ॥
पादादिमूर्धांत सुलक्षणांनीं । संपन्न सामुद्रिक लक्षणांनीं. ॥
लक्ष्मीच किंवा अवतीर्ण झाली । या भीमकाच्या उदरास आली. ॥ १२१ ॥
माला स्मराची विलसे जपाची । कीं चोतली मूस तुझ्या तपाची, ॥
सौंदर्यभू मोदनमूलरेखा, । साहित्यसंगीतकलानिरेखा. ॥ १२२ ॥
नसे तुझ्या त्यां गणना गुणाचा । तेही असे मूर्ति महागुणाची. ॥
ते तूजला हात बहूत जोडी, । केली तिणें आजि तुझीच जोडी. ॥ १२३ ॥
असे स्वभावें बहुधार मोठी । घरामध्यें कामविकार चोंदी. ॥
जीला फुलांनी जड होय झाली । मुक्ताफळांनीं जिस माळ झाली. ॥ १२४ ॥
तथापि बाहेर उभी न ठाके, । अतर्गृहातून कदा न फाके. ॥
ध्याते तुझ्या ते पदनीरजांतें; । असाड नेत्रातुन नीर जातें. ॥ १२५ ॥
जीचा सदा गद्गद कंठ दाटे, । नेत्रांबुनीं खासपूर लोटे, ॥
तुझे कृपेचा नसता जिव्हाळा, । वाचेल कैशी सुकुमार बाळा ? ॥ १२६ ॥

अत्यंत दैनंदिन दैन्य जोडीं, । वात्सल्यलक्ष्मी परि हे न सोडी. ॥
समीप आली दशमी अवस्था । करूं नये या परि त्यां अनास्था. ॥१२७।
तुझ्या गुणांची जपमाळ केली । ते चोखरे भोजनहीं भुकेली. ॥
कृष्णा, तुझीं जें असती चरित्रें । चिर्शी पहा ते लिहिते विचित्रें. ॥ १२८।
दैवें पुरोडाश पवित्र झाला । शिवेल आकस्मिक काय याला ? ॥
त्यां काय देवा तुजसीं वदावें ? । थोड्यांत जाणोन बहूत घ्यावें. ॥ १२९।
हें सर्व आहे नटनाट्य तूझें; । चातुर्य हें व्यर्थ समस्त माझें. ॥
तुझ्या प्रकाशें जग हे प्रकाशे, । त्यां नाहित्या हें जग सर्व नाशे, ॥१३०।
त्यां हालवील्याविण हे न हाले, । त्वदीय सत्तेविण हें न चाले; ॥
जैसेंच निश्चेतन चित्र जैसें, । हें सर्व आहे तुजवीण तैसें. ॥ १३१ ॥
पाहे तुझी वाट मनोद्रपुत्री, । दिसेल तू तो मज दीर्घसूत्री ! ॥
केली निची भेटन हे अनुजा; । आतां असे यावरि काय आज्ञा ? ॥ १३२।

निजेच्या पर्यंकीं किमपि न लगे नीज नयनीं,
वियोगें उद्विग्ना उन्नत वसते भूमिशयनीं. ।
स्मराचे जे तीक्ष्णी तिखट शर राजन्यतनुजा,
चकोराक्षी लक्षी त्वरित मुखचंद्रोदय तुझा." ॥ १३३ ॥

वाक्यें अशी हे जव आयकीलीं, । श्रोत्रें हरीचीं अति तृप्त झालीं. ॥
धरुन हातें मग हात त्याचा । वदे तयासीं स्मितपूर्व वाचा. ॥ १३४ ॥
" झाली असे हेच मला अवस्था, । दिसेत तद्युक्त दिशा समस्ता. ॥
प्रतिक्षणीं व्याकुल चित्त होतें, । विदर्भदेशाप्रति धांव घेतें. ॥ १३५ ॥
रुक्मीच तो मद्विषयीं निषेधी, । कळोन गेलें तुजहून आधीं. ॥
आता रणीं सर्व वधून वैरी, । हरीन ते कांचनगर्भगौरी. ॥ १३६ ॥
चंद्रानना, खंजनमंजुळाक्षी, । क्षीणोदरी, मार्ग मदीय लक्षी. ॥
झाली असे मत्पर पेशलांगी, । तीचें असें शासन कोण लंघी ?" ॥१३७॥
बोलोन ऐसें पणपूर्व शौरी । प्रस्थान नक्षत्र तदा विचारी. ॥
तों दैवयोगें गुरुपुष्य साधे, । मुहूर्त अत्युत्तम कृष्ण लाधे. ॥ १३८ ॥
उत्साह तेणें द्विगुणीत झाला. । तत्काळ तेव्हां रथ आणवीला. ।
आनंदला नंदन देवकीचा, । तेथेंच केला विधि देवकाचा. ॥ १३९ ॥

प्रस्थानकाळीं मह गौरवानें, । समस्त ते यादव राहताने. ॥
करीं उपस्थान महारथानें, । जो येक नाहिं भय मन्मथाचें. ॥ १४० ॥
धरून हात द्विज बैसवीला । विशेष हा आदर दाखवीला. ॥
त्यानंतरें आपण पार टाकी. । तत्काळ तो दारुक अश्व हांकी. ॥ १४१ ॥
वायेत ते घेऊन फार घोडे, । वाटेत हे त्यास दिसत झाडे ॥
ता नावळेंहीं उजवे उडावे. । महा हयी चावडि जाति डोरे ॥ १४२ ॥
उल्लंघिला ग्राम, पुरें, सहारें, । प्राणप्रियाचारुकथाविहार. ॥
आननदेशाहुन येक रात्रें, । तें पाविजे कुंडिन पत्तनेंन. ॥ १४३ ॥

कथा हे कृष्णाची सरल जगदानंदजननी,
मनोभावें ईंच श्रवण करिजे नित्य सुजना, ।
प्रसंग श्रोत्याचे सकलहि महादोष हरती,
यदूत्तमप्रेमें विषयरतगोडी विसरती. ॥ १४४ ॥

इति श्रीमद्भगवद्भक्तपदानुरक्तकविसामराजविरचिते रुक्मिणीहरणकाव्ये नाऽऽगमन नाम पंचम सर्ग ॥ ५ ॥

## सर्ग सहावा.

याहून पूर्वी शिशुपाळ आला, । जेणें विवाहोचित वेष केला ॥
चाले जयाची चतुरंग सेना, । रजोविशेषें रवि हा दिसेना ॥ १ ॥
रुक्मी पुराबाहिर त्यास आला, । करून पूजा मिरवीत नेला ।
वाजेत भेरी, नरखे नगारे, । ते भीमकाची नगरी सजारे. ॥ २ ॥
शोभे महा कुंडिन राजधानी । संपन्न नानाविध सावधानी. ॥
शृंगारिल्या उत्कट राजवीथा । समस्त शृंगाटक नोप देतीं ॥ ३ ॥
प्रासाद अत्युच्च असे असावे, । सताश्व जेथें बहु घे विसावे ॥
जेथें उभारेति महा पताका, । विचित्र वर्णा दिसती अनेका ॥ ४ ॥
काश्मीररसेंसिंचित अंगणांना, । प्रवाळमुक्तामय तोरणांनीं, ॥
द्वारप्रदेशा मह येति शोभा, । पण्यांगना नाचति त्या सदभा ॥ ५ ॥
चैद्येंद्र हा जानवशास आला, । नृपें पुरस्कार बहुत केला ॥
चहूंकडे या प्रसरेत वार्ता. । आरंभलें मूळ महा अनर्था. ॥ ६ ॥

धरिल हे कृष्ण हर्षल जेव्हां । स्वकीय नासे पुरुषार्थ तेव्हां. ॥
म्हणोनि हा मागध खिन्न झाला, । सहाय या चैद्यनृपास आला. ॥ ७ ॥
हा दंतवक्रादिक पौंड्रकांनीं । आईकिजे सर्व उदंत कानीं. ॥
द्वेषी हर्षाने हृदयीं जळाले, । मदें जरासंधमता मिळाले. ॥ ८ ॥
या वेगळे आणिक येति राजे, । बलिष्ठ ज्यांचा दळभार साजे. ॥
कित्येक हे चैद्यनृपा सहाया, । कित्येक हे कौतुकही पहाया. ॥ ९ ॥
तैलंग, कार्नाटक, पांड्य राजे, । त्या द्राविडांचा समुदाय गाजे. ॥
येती महाराष्ट्र महाभिमानी, । कित्येक ते केवळ मद्यपानी. ॥ १० ॥
काश्मीर, पांचालक, गौड येती । आवंत्य, बाल्हीक, अनेक जाती, ॥
कैकेय, गांधार अनेक आले, । सत्कार त्यांचे बहु फार केले. ॥ ११ ॥

मडकरि गणकांला भमिकें आणवीलें,
कनकमय विरांचें बोहलें घालवीलें. ।
इतर बसविले अगंडाचेच लेवे,
वरिवरि करिजेती कस्तुरींचे गिलावे. ॥ १२ ॥

तदुपरी सकळेंही मंदिरें धूपवीलीं,
परम रुचिर चित्रें कारुकीं काढियेलीं. ।
अलि मृदुतरवाला ज्या महा उंच सारा,
अति चतुर फरासी अंथरील्या तिवारा. ॥ १३ ॥

विविध मधुर वाद्यें, चौघडे वाजताती;
अगणित दरबारीं भाट हे गाजताती; ।
तदुपरि मग त्याल्या नेसल्या नायकांने.
अगणित गण येती, सोयऱ्याधायऱ्यांचे. ॥ १४ ॥

आत्या, मामा, मावश्या, सर्व आल्या. । भाच्या, भाच्या, आणिल्या सर्व साल्या. ।
साल्या, जावा, माय, आज्या, वहीणी । आल्या, माने त्या नणंदा, विहीणी.॥१५

सकळहि मग तेथें राजपत्न्या मिळाल्या,
घरुनि मुलिस हातीं स्नानशाळेस आल्या. ।
दुश्चित मन तयेचें होय, कांहीं न चाले,
यदुतिलकविलंबें घाबिरे प्राण झाले. ॥ १६ ॥

ते मांडिली रत्नजडीत चौकी, । मुक्ताफळांचे वसवीत चौकीं. ॥
लागे तिला जे समर्था हरिद्रा, । शची दिसे जीजपुढें दरिद्रा ! ॥ १७ ॥
सख्या तिच्या काढुनि सर्व लेणा, । [illegible] उकलीति वेणी. ॥
जेथें असे कनकदीत न्हाणी, । तेथें तिला नेउनि माय न्हाणी. ॥ १८ ॥
जों जों पडे अंगावरि उष्ण पाणी, । तों तों स्मरची नळकें कृपाणा. ॥
हें मंगलस्नान तयेस झालें, । शरीर सप्रोक्षुन वस्त्र केलें. ॥ १९ ॥

अत्यंत थोर गजरें अति शिघ्र आली,
राकाशशांकवदना सदनात आली. ।
वळणावरी कुटिल कुंतल वाळवीले,
आलीजनें अगरुधूपहि धूपवीले. ॥ २० ॥

अंगें असे सर्व शरीर गोरें, । जयापुढें कांचन होय भोरें. ॥
प्रत्यक्ष हें तेज दिसोन यास, । तथापि लेते नग सोनियाचे. ॥ २१ ॥

भरजर अवघी हे नेसली उंच साडी,
पदर मग तयेचा सुंदरी लाल पाडी. ।
पदकमळ जयेचे वंदाने लोकपाळीं,
सिसफुल धरि माथा, भांग, टीळा कपाळा. ॥ २२ ॥

कांचोळी मोतियांची वरवरिल वसे वक्षदेशीं जियेच्या,
पेट्याचें पेकदाणे, तदुपरि दुलडी कंठदेशीं तयेच्या. ।
रत्नांची रुंद कांची अतिरुचिर जिच्या मध्यभागीं विलासे,
आलीसे क्षीण मध्य म्हणउनि मदन बंध किंवा दिलासे ! ॥ २३ ॥

कोंथिंबिरा, टोपण, घोसराळ्या, । शोभेत कानीं जडिता निराळ्या. ॥
मुक्तामयें वालबडें, विचित्रें । ल्याली असे, जे वदनात पत्रें. ॥ २४ ॥
दर्डी धरी रत्नजडीत वाळी, । ल्याली असे, बेसर दिव्य नाकीं, ॥
गोडाळ हंचे बहु हात गोरे, । वसेत जेथें अति सज्ज दोरे ॥ २५ ॥
त्या बागड्या उत्तम सोनियाच्या, । मधें मधें शोभति माणिकांच्या, ॥
हे पाटल्या, हात-सरास ल्याली, । अत्यंत किर्मीरित कांति झाली. ॥ २६ ॥
त्या आरशा घालुनि आंगठ्याला, । ल्याला असे सुंदर आंगठ्याला, ॥
साख्या, विलोंदे, नकशीजडीता, । दत्तावतारांकित मूर्तिमंता. ॥ २७ ॥

तीच्या वधीचे न रचेत फांसे, । म्हणोन कांहींयक माय हांसे. ॥
चिंतांक चिंताकुल देत नाहीं, । वदान्य चिन्तांत न घेय कांहीं. ॥ २८ ॥
घाली गळां रत्नजडीत पेटी, । अवघ्यांसिंपूंत निघे अपेटी. ॥
चांपेकळ्यांच्या मिरवेत माळा, । मुक्ताफळांच्या दिसती समाळा. ॥ २९ ॥
ते जोड पायीं सज सांखळ्यांचे, । शोभेत दोन्ही घर पैंजळ्यांचे. ॥
वाळा, कडीं, पैंजण जाण त्याली, । त्या खालते घुंगुर सज्ज घाली. ॥३०॥

अनवट निडल्या ही जोड त्या जोटव्यांचा,
अनुपम उमटे हा शब्द पोल्हारियांचा. ।
रुचिरतर धियेच्या शोभतां अंगुळीला,
कितियक नग देतां भार झाला मुलीला. ॥ ३१ ॥

क्षणभरि परि तीचें चित्त हें स्वस्थ नाहीं,
म्हणउनि नग देव्हां लेतसे स्वल्प पाहीं. ।
अविरल मग वाळा मोकळे केश बांधे,
वदनविधुभयानें ध्वांत हे कावरोधे. ॥ ३२ ॥

सुस्नात देवी मग ते सुशीला । प्रवेशली येउनि यज्ञशाळा. ॥
जे पीत रंगाइव उंच नेसे, । जे हेमपीठावरि सज्ज बैसे. ॥ ३३ ॥
जे पेकलें मंगल मगळाचें । ते येकदाणें मिरवे गळांचें. ॥
वाळ्या धरी रत्नजडीत कानीं, । नासेस मोतीं विलसे सुपानी. ॥ ३४ ॥
जीच्या स्वरें लाजतसे विरंची, । माजीं जिच्या रत्नजडीत कांची. ॥
त्याली असे जे मुद, रासडीला, । झाली अवे तांतडि तांसडीला. ॥ ३५ ॥

पुण्याहवाचन करुन वचेत दोघें,
आहेर घेत असती द्विजमंत्रयोगें. ।
बैसे पुढें अति सुलक्षण ते कुमारी,
नीराजनें करिति तीस अनेक नारी. ॥ ३६ ॥

महापदोपासक, अग्निहोत्री, । पुरोहित, श्रोत्रिय वत्सगोत्री ।
पुढें निघे उत्तम संप्रदायी, । ज्यामींवते भोंवति वाजपेयी. ॥ ३७ ॥
अथर्ववेदें गृहयज्ञ केला. । ते भीमकीला अभिषेक झाला. ॥
हिरण्यगोभूतिलवस्त्रदानें । ईच्या करें देववितो नृपानें. ॥ ३८ ॥

मिळति सकल तेथें ऋग्यजुः सामवेदी,
शतपुरुष जयांची हे अविच्छिन्न वेदी. ।
त्वरित बहुत केली मंडपादि प्रतिष्ठा,
धरणिपतिस देवीं ब्राह्मणीं थोर निष्ठा. ॥ ३९ ॥
देशोदेशींहून ते विप्र येती, । कीर्ती ज्याच्या नित्य जे आयकेती. ॥
देशीं गांवीं टाकुनीयां कुटुंब, । लागे मागें अर्भकांचेंच लोंबें. ॥ ४० ॥
वऱ्हाडी, कऱ्हाडी, बहु खानदेशी, । वऱ्हाडास येती कनोजे, विदेशी ॥
तसे कानडे, कोंकणे, वागलाणे, । महा मस्करे माथुरे, जे शहाणे. ॥४१॥
कित्येक हे येति दशावधानी, । जे कुंडलें हालविताति कानीं. ॥
पदोंपदीं देति महापरीक्षा, । जाली असे सौमिक ज्यास दीक्षा. ॥ ४२ ॥
भजेत कोणी जन माधवाला, । आराधिती एक उमाधवाला, ॥
सेवीत कोणी द्विज अंबिकेला, । नसेच हा वस्तुविवेक केला. ॥ ४३ ॥
अपार ते दीक्षितभार येती, । समागमें जे पशु वागवीती. ॥
प्रत्यक्ष दमप्रतिमाच जे कीं । आस्था नसे हे सदसद्विवेकीं ! ॥ ४४ ॥
कित्येक तेथें अजपा जपेती, । अव्यग्र जे उग्र तपा तपेती. ॥
समाधिसेजे द्विज जे निजेले, । पडेति ते फोडुन कर्मजाळें ! ॥ ४५ ॥
पढेत अध्याय सदा क्रमाचे, । बोलेत जे बोल पराक्रमाचे. ॥
कित्येक तेथें पढताति पांच्या, । कित्येक माळा धरिती जपाच्या, ॥ ४६ ॥
कृष्णातीरींहून ते माध्व आले, । ज्यांच्यामागें शिष्यसंभार चाले. ॥
आंगोआंगीं लाविती श्रीशमुद्रा, । ग्रंथोग्रंथीं निंदिती नित्य निद्रा. ॥ ४७ ॥
हातीं घेती तीर्थगड्या, गवाळीं, । चवू, चंच्या, आसनाचीं चवाळीं, ॥
माथा ज्यांच्या शोभती उंच टोप्या, । विद्या गर्वें वाटती सर्व सोप्या. ॥ ४८ ॥
स्वधर्मे गोदेच्या उभयपुलिनीं वास करिती,
सदा श्रीकृष्णाच्या चरणयुगुलीं जे विचरती. ॥
सदां चारी वेदाध्ययनरत वेदांत पढती,
तयांचे हे तेथें अतिशयित सन्मान घडती. ॥ ४९ ॥
द्विज परम शहाणे, हे महाराष्ट्र येती ।
तदुपरि मग दैवी गौडखे, गुर्जराती, ।

मिळुनि सकल तेथें मंडपामाजि आले,
सविनय अवघे हे भीमकें पूजियेले. ॥ ५० ॥
हातीं जयांच्या झळकेत झान्या, । त्या धोतरांच्या विलसेत धान्या, ॥
काशीनिवासी कितिएक आले, । सत्कार त्यांचे बहु फार केले. ॥ ५१ ॥
गाणेश, जे शांभव, सौर आले, । एकांत ते एक मिळोनि गेले. ॥
जे पुजिती शाक्त विविक्त यंत्रें, । घेती बिन्हाडें परवीं स्वतंत्रें. ॥ ५२ ॥
येती पुढें जे जन हे वऱ्हाडे, । मिळेत त्यांला परवीं बिन्हाडें. ॥
राहेत देऊन कित्येक भाडें, । धरूनि कित्येक अपूर्व झाडें. ॥ ५३ ॥
कित्येक ते देत असेत बाडें; । फिरेत कित्येक उगीं ख्याडें; ॥
आरोपिले मंडप यापनकीं; । आक्रांदती अंध, अनाथ, मूकीं. ॥ ५४ ॥
शोभेति बोटे परबे विटांचे, । समूह जेथें वसती विटांचे; ॥
साध्वी महा सुंदर लोकदारा । ज्यांच्या भयें येत नसेत दारा ॥ ५५ ॥
बाजार जारीं बहु वेढियेले । बाहेर सच्छ्रोत्रिय काढियेले; ॥
आलोकिती नित्य परांगनांतें, । लावीत त्यांसी अनुकूळ नातें. ॥ ५६ ॥
येती महादांदिल मोठपोटे; । भारीपणें हे कितियेक छोटे; ॥
धरून बैसेत वृथा प्रतिष्ठा, । द्रव्यार्जनीं मुख्य धरीत निष्ठा. ॥ ५७ ॥
शिष्यांस जे केवळ रावबीती, । जे स्नानसंध्या बहु लांबवीती, ॥
उगाच ज्यांचा पसरे पसारा, । भुलोन गेला मग लोक सारा. ॥ ५८ ॥
जेव्हां येती भार नैय्यायिकांचे, । गोळा होती प्राण मीमांसकांचे; ॥
हातीं पायीं फूटती ज्यास जीभा, । जेव्हां तेव्हां बोलतां वाद उभा. ॥ ५९ ॥
परस्परें शिष्य करीत पृच्छा. । म्हणेत, ' तू बोलसी काय, तुच्छा. ॥
बोलो नको तूं; क्षण एक राहें; । माझा उपन्यास समग्र पाहें. ॥ ६० ॥
बोलेन आतां अनुमान खडी. । तुम्हांमध्यें हें मत कोण खंडी ? ॥
तर्कात युक्ती चढती उदंडा, । घेऊं नको व्यर्थ उगा वितंडा. ॥ ६१ ॥
काढूं नका ये समयीं कपाळें. । याच्या विचारें उठती कपाळे. ॥
हें निग्रहस्थान तुम्हांस आलें; । नैय्यायिकांचें यश थोर झालें. " ॥ ६२ ॥
वदेत मीमांसक योग्यताभरें, । " वेमातुरा व्यर्थच चरू चींवरे. ॥
असेत हें केवळ बुद्धिरोधनें; । नसेत कांहीं परलोकसाधनें. " ॥ ६३ ॥

वेदांती म्हणताति, " शास्त्र सर्वे आमूळ आलोडिलें,
त्याचा हा परिपाक आजि दिसला, या पंडिता मोडिलें. ।
कैचे न्याय ? किमर्थ याग करणें ? संसार हा पारखा.
मिथ्याभूत समस्त जाणुनि तुम्ही अद्वैत हे वोळखा. " ॥ ६४ ॥

प्रतिष्ठेनें येती कितिक कविराजेंद्र सदना,
जयांच्या पद्यांच्या अनवरत चालेत रचना. ।
तयांचे दारीनें अपरिमित दाटेत सदनें,
कुरंगाक्षींचीं जे अति चतुर पाहेत वदनें. ॥ ६५ ॥

त्यानंतरें जाति अलंकृत राजदासी
वाद्यस्वनें निघति बाहिर सपदासी. ।
हर्म्यावरून विकसे आणि मोगरेलें
वाटीत जाति नगरात, अपूर्व झालें. ॥ ६६ ॥

आज्ञा नृपें स्ववनितेस हळूच केली.
ते सुंदरी त्वरित पाकगृहात आली. ।
राधून घेत तव त्या मग राधणारी,
ज्या धूतलेंच बहु धूतिल हो धुणारी. ॥ ६७ ॥

नसेत जेंव्हा तळण तळाया, । ते अर्भकें धावति आतळाया ॥
आकार होती बहु रेकराचे । वाजेत तेथें घरके कराचे. ॥ ६८ ॥

ठेवूनि शाका वर त्या दिजाया । कढींत घालीत वडे भिजाया. ॥
खोवोन आर्धी पदरास पोटीं । नितंबिनी उत्तम डाळी वार्गी ॥ ६९ ॥

सुदेवपत्नी अति मंद आली, । माम्योदरें जे सुकुमार जाली. ॥
असे दहाणीं उसळून सोले, । जीच्या करें सूरण फार सोले ॥ ७० ॥

अत्यंत आणीच विकारल्याला, । उपाय जाणेच विकारल्याला ॥
करीतसें जे गुण पापडीला, । तथापि जाला श्रम पापडीला. ॥ ७१ ॥

तळणवळण केलें, कोरके सिद्ध जाले
त्वरित परम तेथें भात हे वेळियेले. ।
रुचिर बहुत शाका पोडण्या देयिनेती.
तदुपरि मग तेव्हां आपुळी सांगिडेती. ॥ ७२ ॥

स्नानें करुन मग विप्र समस्त आले.
सत्कारपूर्वक यथोचित बैसवीले. ।
पात्रें सुवर्ण रुचिरें मग मांडयाली.
गंधाक्षतें कितियकीं मग चाल्यांली. ॥ ७३ ॥

कोशिंबिरी विविध, सांठ, मिरें, मुळेंही
तेथील हे त्वरित वाढिति ते मुळे ही. ।
अत्यंत जें रुचिर रोचकतेस आल,
तें वाढिजे कितियकीं अति रम्य आलें. ॥ ७४ ॥

वाढावया निघति सुंदर त्या सुशीळा,
वीजेहुनी चपळ ज्या चमकेति बाळा; ।
ज्या लोणचीं रुचिर, पापड, पत्रशाका
वाढीत जाव असतां भुलवीत लोकां. ॥ ७५ ॥

त्यानंतरें विविध ओदन वाढिजेती,
अत्यंत जे निवति ते मग काढिजेती. ।
शोभेति ते सघृतशर्कर पायसांचें,
अत्यंत फार पिवळीं वरवीं वरानें. ॥ ७६ ॥

अत्यंत वर्तुल वडे अरवार भारी
वाढीति त्या गजगती सखवार नारी. ।
ते थोरवें सरवळे आणि माल्त्यांला
वाढीत जाति बहु चारिक सेवयांला. ॥ ७७ ॥

त्या पोळियांच्या चळया रचाया । परस्परें वाढति वायका या. ॥
वाऱ्या, पुऱ्या, तेलवऱ्या विदग्धा । वाढीत दुग्धे कितियेक मुग्धा. ॥ ७८
वाढीत तेथें वरव्या करंजा । ज्या सुंदरी गंधविती निरिंज्या. ॥
कोणी घड्या घालुन मांडयांच्या, । नेतीं घराता मग सांडयांच्या. ॥ ७९
मुखेंदु हे निंदिति आरशांला, । त्या काय नेणेत अनारशांला ? ॥
नितंबपर्यंत पडेत वेण्या । त्या सुंदरी वाढितसेत फेण्या. ॥ ८० ॥

जेव्हां घृतान्त परिवेषण सर्व जालें,
आपोशनादि मग कृत्य समग्र केलें. ।

पंक्ती अनेक वसती विविधप्रकारा
याळा तथापि करिती बहु येरझारा. ॥ ८१ ॥
जेथें नद्या लोटति या घृतांच्या
दह्यां, दुधांच्या, मधुरा मधाच्या; ।
पडेत हे पर्वत शर्करांचे,
लोपोन गेले रव कर्करांचे. ॥ ८२ ॥
मागेत कोणी द्विज ते फराळा. । आरंभितां पाक फिरतां निराळा. ॥
भक्षीत कोणी मग ते हविष्यें; । वर्णोंच त्यांचीं असती भविष्यें. ॥ ८३ ॥
कितिपक सुर तेथें स्वाग झिव्हेस देती.
अनियत हरिनामें भक्त कित्तेक घेती. ।
विविध परम होतो नामसघोष जेथं;
घडिघडि बहु देते भामकी कान तेथं. ॥ ८४ ॥
सहज निजजिवाचा जाय जो अंतरींचा,
निशिदिवसच लागे वेध त्या श्रीहरीचा. ।
अनिश हृदय तीचें तत्स्वरूपाभिलाषी;
मुखकमळ तयेचें तद्गुणीवाभिलाषी. ॥ ८५ ॥
करजळ पुतळ्यातें नित्य चोरून पाहे;
परि निजजननींच्या अंतरीं धाक वाहे. ।
घडिघडि करिते जे प्रश्न निश्चिकाला.
हळुच मग निवारी वधुसर्वाधिकाला. ॥ ८६ ॥
क्षितिवरि पदरेशी नित्य निद्रा करीते.
व्रत नियमतपस्या अंतरीं आदरी ते. ।
स्वन जव अजिरीं हे आयके वायसाचा,
उडुन कवळ त्यातें घाल्वी पायसाचा. ॥ ८७ ॥
न वर्दति स्वयमर्दा स्वंग्ध स्वप्रसर्णा.
श्रमित बहुत जाले अंग टाकी पलंगा. ।
परम विकळ बाळा फार चिंता करी ते,
अनिश यदुपतीचे पाय जे आठवीते. ॥ ८८ ॥

मज्ञ विश्वासाचें नित्य बहु आनंदलतिका;
    दिसतांना हे तैसी अविचतुर शृंगारकलिका. ।
सख्या दोहीं भागीं वसति उरसा सावधपणें.
    कनिष्ठेच्या वक्राभिमुख करिजेतें मुख पिणें. ॥ ८९ ॥
अद्यापि वैकुंठनिवासयेना; । वेथून त्याचें मन हें निघेना; ॥
लग्नास तों रातिच आड आहे; । करील ना ईश्वर कां कृपा हे ? ॥ ९० ॥
जाली असे हे प्रतिकूळ गौरी, । ह्मणोन हा काय न येच शौरी ? ॥
अत्यंत दैवेंकरि हीन जालें, । ह्मणोन ये दीनदशेस आलें. ॥ ९१ ॥
हरुन माझ्या जिवसावजाला. । तो आजि कैसा हरि साव जाला ? ॥
आतां कशाची मज जीवनाशा ? । जालें असें सन्मुख जीव-नाशा. ॥ ९२ ॥
जो द्वारके ब्राह्मण पाठवीला । अद्यापि नाहीं परतोन आला. ॥
जे भक्त कृष्णाप्रति पावताती । फिरोन ते काय घरा न येती ? ॥ ९३ ॥
वाटेस अद्यापि असे निजेला ? । किंवा घरींहून नसेच गेला ? ॥
कीं द्वारकेची पदवी न चाले ? । कीं कृष्ण आतांच विरुद्ध बोले ? ॥ ९४ ॥
प्रत्युत्तरें हे न सुचेत याला ? । किंवा सभाक्षोभ तयास जाला ? ॥
किंवा निषेधी वसुदेवदेवा ? । सकोप संकर्षण हा वदे वा ? ॥ ९५ ॥
कीं लागला वैदिक तो गुणाया ? । कीं लुब्ध जाला भगवद्गुणां या ? ॥
त्या संपदा देखुनि थोरथोरा । कीं गुंतला ब्राह्मण पाहुणेरा ? ॥ ९६ ॥
किंवा वसे नित्य करीत इष्टी ? । कीं चाल्तां श्रोत्रिय होय कष्टी ? ॥
स्वाभाविक च्छांदस वृत्ति ज्याची । पाहातसें व्यर्थच वाट त्याची. ॥ ९७ ॥
जेथें नसे आदर नारदाचा । कदापि या योगविशारदाचा, ॥
अद्यापि जेथे शुक बैसला, गे; । हा विप्र कोणे लगडेस लागे ? ॥ ९८ ॥
तथापि तो बंधु अकिंचनाचा । प्रसिद्ध हे शास्त्रपुराणवाचा ॥
हा येक विश्वास असे मला, गे; । परंतु मार्गी हरि हा न लागे. ॥ ९९ ॥
त्या देवकी आदिकरुन राण्या । निषेधिती काय महा शहाण्या ? ॥
कृष्णार्थ कृष्णास पडेत गुंवे ? । कीं योगियांच्या हृदयांत गुंवे ? ॥ १०० ॥
कीं पूर आल्या बहु आपगेला? । कीं आडवा येऊनि साप गेला ? ॥
किंवा रथाचें युग भग्न जालें ? । कीं पांखरूं आजि उडोनि गेलें? ॥ १ ॥

किंवा निजे शेषविशेषतल्पीं । कोणे तयाने उठिजेल कल्पीं ? ॥
किती तरी येथुन वाट पाहों ? । आकल्पपर्यंत असीच राहों ? ॥ २ ॥
येकीकडे लौकिक सर्व ठेवूं । निर्लज्ज येकांत म्हणोन घेवूं ? ।
कीं द्वारके धाडुन जीव देवूं ? । कीं पक्ष लावून उडोन जाऊं ? ॥ ३ ॥

नृपतिकुळकळंका म्यां तुझें काय केलें ?
पथवरि शिशुपाळा का नृपा आणियेलें ? ।
तुजजवळि पडे हे चालि नीचा जनांची.
निपटच हळवारे वृत्ति तुझ्या मनाची. ॥ ४ ॥

कळत कळत घेसी जीव या मानवाचे.
तुजजवळि भल्यांचा काय सन्मान कान्हे ? ।
अति विमळ कुळीं ये भूत निर्माण होती.
शिव, शिव ! भगवता जाव हा काय देशी ? ॥ ५ ॥

पदीं श्रीकृष्णाचे अविरत मनोवृत्ति विवरे.
वियोगें त्याच्या हा क्षणभरि मला धीर न धरे. ।
रहावी हे माझी यथुनि अवघी हीं व्यवसितें.
कितेकां या देवां विविध नवसातें नवसितें. ॥ ६ ॥

गणाधीशा जे जे स्मरति तुज सकळसमर्था,
पहा, ते ते होती मनुजजन आजन्म विजयी. ।
कुमारा गौरीच्या, म्हणुन विनवीतें तुज वरें.
चतुर्थी तूझ्या मी करिन अवघ्या थोर गजरें. ॥ ७ ॥

असो हें काठिण्य क्षितिधरकुळोत्तसकुल जे.
वदों वारवार प्रकट तुजसीं काय तुळजे ? ।
न सोसे काहींही शिवसुरत सप्रेम रतिकें,
तुला कीं नाहीं हा अनुभव, शर्वार्धपतिके. ॥ ८ ॥

उदारा मल्लारी, अति विषय चिंतानळ हरीं.
कृपापारावारा, प्रकट करिं कारुण्य लहरी. ।
सहसा स्वर्डीचा तुजवरिच भंडार उधळीं.
करावें त्या ऐसें झडकरि पडें यादवकुळीं. ॥ ९ ॥

विचारें या व्हावा निखिल निज राज्यांत चळवळ.
 घडे, चाळे, कैशी असरळ तुझी बुद्धि कळवा ! ।
कदाचित् हे वार्ता, कमळमुखि, फोटूनहि फुटे;
 घरामध्यें तेव्हां अभिनव अनर्थांकुर उठे. ॥ २४ ॥

मिळाले हे पृथ्वीवरिल, सखि, राजन्य अवघे.
 कुबे वेडे, मूके, बधिर आणि विद्रूप अवघे ! ।
फसाला हा आतां अविनय, सुचे, आवांद वरी.
 बरें जालें दे हा अति चतुर सज्ञान नवरी. ॥ २५ ॥

अवश्यं भावी हें सहज जरि होणारच असे,
 अपलेंही तुझ्या कर्कशहलघीं घेउन वसे. ।
महा धीराची तूं; निपट तकवा सोडिसि कसा ?
 उतावेळी होशी म्हणउनि तुझे हा भरंवसा. " ॥ २६ ॥

सखीच्या वक्त्रें हा गरळमय पर्जन्य पडला;
 अहो किंवा उल्कापतनसदृश पडला. ।
जरी हे कांहींही विधुर न वदे वारिजमुखी,
 महाप्रस्तावीं ते तदपि पडलावे बहु सखी. ॥ २७ ॥

दगदली वदतां बहु भीमकी. । न समजे कुसुमायुध पावकी. ॥
उपचडे सुटली तिजला बहु; । शयनिचीं सुमनें खुपती मऊ. ॥ २८ ॥
निपट हा तकवा हिजला नसे. । उठुन ते शयनावरती बसे. ॥
बहुत जे बरळे विविधापरी, । सुख नसे सहसा जिस अंतरीं. ॥ २९ ॥
"भुवननायक, कंजविलोचना, । गरुडवाहन, शोकविमोचना, ॥
रुससि कां मुरलीधर, माधवा, । मदनमोहन, गोकुळबांधवा. ॥ १३० ॥
व्रजपती, जपती तुज गोपिका । अझुणि देखुनि, नंदकिशोरका. ॥
नरहरी, शरणागतवत्सला, । परतसी अथवा निज गोकुळा ? ॥ ३१ ॥
अझुनि गुंतसि गोधनदोहना ? । परम व्याकुळ मी, मनमोहना. ॥
मुरलिवादनिं तादश हे सवे; । परि तुझें वय हें तयिचें नव्हे. ॥ ३२ ॥
उबगती सखिया निजजीविता; । न पवती कुळिच्या कुळदेवता; ॥
जनक हे जननी मजला नसे; । यदुपती मज आस तुझी असे. ॥ ३३ ॥

सकळ नृप पहावां पार्थसारथ्य घेलें,
यदुपति तुज तेथें काय हताश आलें ! ।
क्षणभरि मजसाठीं येथपर्यंत येतां,
अभिनव पडलें, रे, थोर कोडें, अनंता. ॥ ४३ ॥
यदुपति तुजसाठीं मीच मार्गण आलें;
अकथित कमठीच्या मीन पोटास आलें; ।
अति विकट वराहा मीच झालें वराही;
तदुपरि नरसिंहा होय मी नारसिंही. ॥ ४४ ॥
अभिनव तुज रामा मीच रामावतारीं;
प्रकृतिहि तुजसाठीं भीमकाची कुमारी. ।
क्षणभरि मज, कृष्णा, आठव्या, नाठवीशी;
व्रजयुवतिहृदयें अंतरीं मांडवीशी. ॥ ४५ ॥
स्वकीयां भक्तांचें निरुपम महा वेड तुजला;
असे, हें, श्रीकृष्णा, अविदित असे काय मजला ? ।
मदीय मारूपें स्मरणहि कृपाचें तुज नव्हे.
कृपाळा, हे लागे अभिनव तुला कोठुन सवे ? ॥ ४६ ॥
निजध्यासें तूझ्या न समजति संसाररचना,
सदा वेडे होती, अनुसरति तूझ्याच वचना, ।
तुला गाती, ध्याती, अनिश भजती, भाविकपणें,
तयांचें तूं, कृष्णा, क्षणभरि पडों नेदिस उणें. ॥ ४७ ॥
महाबाहो कृष्णा, परमपुरुषार्थैकनिलया,
तुझ्या नामें जाती सकळहि महा दोष विलया. ।
रथांच्या कोटींनीं विविध बिरुदें जात नसती,
घनःश्यामा, तेंही प्रकृत मज निःसार दिसती. ॥ ४८ ॥
पिता, माता, भ्राता, सखिनिवह वंचून, तुजला,
मुखें या विप्राच्या सकल अवघा भेद दिधला; ।
अशी मी हे तूझी परम अपराधीणच असें.
न योजे हें, कृष्णा, अद्यपि तुज पत्रोत्तर कसें ? ॥ ४९ ॥

तुझ्या या पायांशीं प्रथम सत्संगानें चढतचें.
   मनामध्यें तूझ्या वजकुलवि दारिंद्र्यहि धरे, ।
मशीं आतां, कृष्णा, तिळभरि दुजाभाव न धरीं.
   समाक्षाभिक्षेनें प्रणतजनसंभावन करीं. ॥ ५७ ॥
फुकाचें दार्थातें अनुचित उदासीन धरणें.
   समर्थे रंकाशीं असदन असा रोष करणें. ।
अकस्मात स्वामी मन विषयगर्तांतुन उठे.
   तुझे भेटीसाठीं निशिदिवस माझा जिव तुटे. ॥ ५८ ॥
जिवें-भावें कृष्णा, शरण तुज आलें यदुपती.
   न व्हावें हें दावें म्हणुनि करितें तूज विनती. ।
तुझ्या वेडा लागें, सहज निजकर्तव्य विसरें.
   अकर्तव्याचा हे प्रकृत पदवी ही अनुसरें ॥ ५९ ॥
नये कोण्हा हातीं, यदुपति, समाचारहि तुझा;
   असे झाला माझा म्हणुन मजला जीव अवघा ।
महाप्रस्थानाचे अनुभवुन क्लेश पुरवे
   तुझे भेटीसाठीं पुनरपि हरी प्राण परते. ॥ १६० ॥
अरे, तूझें नाम स्मरण करितें अंतसमयीं.
   गुणे राहे, कृष्णा, बघुन पुरता होय विजयी! ।
वियोगें या तूझ्या निघत जरी लोकांतर मला;
   अरे याची पृच्छा सहजच पडे केवळ तुला. ॥ ६१ ॥
परित्याग स्त्रीचा कवण पुरुषार्थी नर करी?
   असें हें श्रीकृष्णा, अपयश शिरीं वीर न धरी. ।
उसासा हे टाकी सुकृतरससारांस विघडे,
   अनेका हिंसाची सहज मुरकुंडी वरि पडे. ॥ ६२ ॥
अरण्यीं श्रीरामें अवगणुन सीतेस त्यजिलें,
   जगामध्यें कोणें समुचित असें त्यास म्हटिलें? ।
परी श्रीरामाच्या दढतर महादोष विलगे;
   कसा या दोषाचा दशरथकुळीं डाग न लगे? ॥ ६३ ॥

पहातां त्वन्मार्ग, त्रिभुवनपती, नेत्र शिणती.
कृपासिंधू, स्वामी, कवण तुजला लोक म्हणती ? ।
तुझें हें पाषाणें हृदय बहुधा आजि घडिलें.
कठोरत्वें किंवा अति कठिण आमूळ मढिलें. ॥ ६४ ॥

सये, माझ्या दुःखें उपवन लता या दुखवती.
पहा, हे पक्षी ह्या वदनगत चारा विसरती. ।
विलापें या माझ्या द्रवति बहु पाषाण, सखिये.
शठाचा, हा बाई, मुकुटमणि अद्यापिहि न ये. ॥ ६५ ॥

इच्या वक्त्रांभोजापसुन सज वाग्बाण सुटती,
मनीं श्रीकृष्णाचे अति तिखट जाऊन रुतती. ।
असे जाला तेणें क्षणभरि अति व्याकुळ हरी.
प्रियेच्या आक्रंदें किमपि न सुचे ते अवसरीं. ॥ ६६ ॥

कथा हे कृष्णाची सकळजगदानंदजननी,
मनोभावें ईचें श्रवण करिजे नित्य सुमनीं; ।
प्रसंगें श्रोत्यांचे सकळहि महादोष हरती,
यदूत्तंसप्रेमें विषयरसगोडी विसरती. ॥ १६७ ॥

इतिश्रीमद्भगवद्भक्तपदानुरक्तकविसामगजविरचिते रुक्मिणीहरणकाव्ये रुक्मिणीविलापो नाम षष्ठ.सर्गः ॥ ६ ॥

## सर्ग सातवा.

विचारें विप्राच्या हृदयगत, चोरून मजसी
रथें येक्या गेला; निपट न दिसे बुद्धि सजसि. ।
विदर्भी वीरांचें धनतर महामंडळ मिळे;
तयासी युद्धाचा समय पडल्या कृष्ण न ढळे. ॥ १ ॥

मनीं हे आशंका धरुन मुसली घेउनि निघे,
सवें ते सेनेचे निवह सज घेऊन अवघे. ।

अजतरगजनें जे स्नानसंध्यादि कर्मे
    जळुन सकळ गेलीं या तुझ्या दौत्यधर्मे. ॥ २५ ॥
तां भौमकी मज अनुग्रह थोर केला.
    श्रीकृष्णदर्शनमहोत्सव दाविंयेला; ।
येथून हे सकळ निस्पृहवृत्ति जाली;
    वेडी प्रपंचभर सर्व तुटोनि गेली. ॥ २६ ॥
श्रीरंग जो गरुडवाहन शेषशायी,
    ब्रह्मादिकां अभयदानवरप्रदायी ॥
त्यां तीं तदर्थ अति यत्न नसेनि केला;
    तूझ्या परंतु सुकृतें भगवंत आला. ॥ २७ ॥
वृत्तांत हा सकळ तूज निवेदिलाहे
    माझें प्रयोजन अतःपर काय आहे ?
आज्ञा मला त्वरित दे स्वगृहास जाया." ।
    हे बोलतां वदतसे मग आदिमाया ॥ २८ ॥
" अत्यंत बापा श्रमलास भारी. । स्वकीय हे वांचविली कुमारी. ॥
जामात हा श्रीरति आणियेला । मदर्थ त्वां उत्कट यत्न केला ॥ २९ ॥
न वर्णवे हा उपकार तूझा । तू तत्वदर्शी गुरुराज माझा ॥
हे सार्थक ठेवा समस्त जाले. । मनोरथा अंकुर आजि आले. ॥ ३० ॥
उत्तीर्ण आतां तुज काय होऊं ? । प्राणेशदात्या तुज काय देऊं ? "॥
बोलोन हे अंजळि जोडियेला; । प्रणाममात्रें द्विज बोळवीला ॥ ३१ ॥
जो दैवयोगें कृतकृत्य जाला । तो हा गृहासंनिध विप्र आला. ॥
विचित्र गेहस्थिति देखियेली. । गजांतलक्ष्मी सदनास आली. ॥ ३२ ॥
कोणीकडे वाट चुकोन आलों । स्वकीय वीथी विसरोन गेलो ?
किंवा असें जागृत कीं निजेलो ? । उगाच कां मी वचकों निघालों ? ॥ ३३ ॥
करून हे तर्क तटस्थ राहे. । चहूकडे संशयरूप पाहे. ॥
तों ते गृहस्वामिणि देखियेली । जे हे गृहाबाहिर शीघ्र आली. ॥ ३४ ॥
विनीत अत्यंत, महा सुशीला, । प्रणाम येऊन पतीस केला. ॥
धरून हातीं सदनांत नेला । सुवर्णपीठावरि बैसविला. ॥ ३५ ॥

पदाबुजें क्षाळुन आदरानें । पुशीतसे जे वसनांचळानें. ॥
आचात जो हा विमळा जळानें । संतोषविला व्यजनानिळानें. ॥ ३६ ॥
लेंकी सुना येउन भेटताती, । ते दासदासीजन दाटताती, ॥
स्त्रीपुत्रमित्रादि कुटुंब पाहे । तों सर्वही हें अनुकूळ आहे. ॥ ३७ ॥
मनामध्ये विस्मय थोर जाला. । उठोन जों होमगृहांत गेला, ॥
तों सर्व तेथें विपरीत देखे, । जेथील तेथें उगलाच थोके. ॥ ३८ ॥

सुवर्णाची वेदी, जडित अरणीयुग्म विलसे;
सुवर्णाचीं पात्रें द्रुपदुपल सौवर्णच दिसे. ।
सुवर्णाच्या जाल्या सकळहि पहा दर्भसमिधा.
म्हणे हे कृष्णाची सकळ करणी होय बहुधा. ॥ ३९ ॥

तदुपरि नृहरीचा शंख गंभीर वाजे.
गजरभिति बहाडीं सर्व भाकेति राजे ।
पडति बहुत तेव्हां रुक्मियाचे धसासे
अगणित शिशुपाळें टाकिजेती उसासे. ॥ ४० ॥

त्रिभुवनपति दोघे रामकृष्णाख्य आले
नृपतिजवळि ऐसे दूत सांगो निघाले ।
अभिनव हृदयीं हा थोर आनंद जाला.
अभिमुख मग त्याला सैन्य घेऊन गेला. ॥ ४१ ॥

तदुपरि हरिसेनेमाजि सेना मिळाली.
म्हणउन मग तेव्हां दाटि होऊं निघाली. ।
कितियक मग तेथें भेटली एकमेकां,
वदति कितियकांला वेणपर्थी अनेकां. ॥ ४२ ॥

तदुपरि हरिपूजा हे यथायुक्त जाली
प्रणति मग तयांते भूप साष्टांग घाली. ।
विनययुत उभा तो हात जोडून राहे.
विनउन नृहरीतें तो पुरामाजि वाहे. ॥ ४३ ॥

कळत कळत म्यां वा थोर अन्याय केला.
तदपि परम माझा हेतु हा पूर्णीला. ।

सहज मज अनाथा नाथ तूं आजि होशी;
निजपदभजकांचा नित्य कैवार घेशी. ॥ ४४ ॥
अलभ्य तुझा मज लाभ जाला. । पवित्र हा देश समस्त केला. ॥
यानंतरें या नगरांत यावें, । कृतार्थ. कृष्णा, मज तां करावें. ॥ ४५ ॥
त्यानंतरें सस्मित कृष्ण बोले, । "मार्गील ही लोक समस्त आले; ॥
पुरांत संमर्द बहूत जाला, । होईल कोठें अवकाश यांला? ॥ ४६ ॥
याकारणें निश्चय हा करावा, । अंबालयासंन्निध ठाव द्यावा. ॥
आणीकही हा एक हेतु आहे, । पुरांमध्यें तो शिशुपाळ राहे. ॥ ४७ ॥
हे आमचे यादव फुद मोठे; । ते चैद्य पूर्वीहून लोट खोटे. ॥
वाढेल बोलें यरि बोल जेव्हां । लग्नापुढें येईल विघ्न तेव्हां."॥ ४८ ॥
भावार्थ याचा समजोन गेला. । राजा विदर्भेंद्र घरां निघाला. ॥
अवश्य अंबालय आदरावें, । परंतु मार्गे तरि यान जावें. ॥ ४९ ॥
स्थळीं स्थळीं सर्व उभ्या रहाती । पौरांगना, वाट तुझी पहाती. ॥
या कुंडिनाची रचना प्रसंगें । आलोकिजे किंचित दृक्तरंगें. ॥ ५० ॥
विशति भूपें अनुरूप केली, । पडोन चित्तांतिल गोष्टि आली. ॥
रामाकडे कृष्ण तथापि पाहे. । तोही तया सम्मत देत आहे. ॥ ५१ ॥
विशापिलासें अति गोड बोली । आरूढ जाला हरि चौर डोली. ॥
अक्रूर सानंद रुमालधारी; । सभोंवते चालति धीर भारी. ॥ ५२ ॥
ते आतपत्रादिक राजचिन्हें । शोभोति तैसीं नगरीं निशाणें. ॥
वाजेति हत्तीवर ते दमामे । त्याच्या स्वनें हा शिशुपाळ वाने. ॥ ५३ ॥
पुढें पुढें तो गजभार चाले, । त्याहून मागें रहवाळ जाले. ॥
सर्वांस अग्रेसर भूप जाला; । हा द्वारकाधीश पुरांत नेला. ॥ ५४ ॥
पहावया नागरलोक आले । आलोकनें नेत्र कृतार्थ जाले ॥
कित्येक तेथें सवरें करीतां । होतीं नमस्कार अनेक रीतीं. ॥ ५५ ॥
सुवर्णपुष्पें उडवीत कोण्ही । जोडीत निष्किंचन हात दोन्ही. ॥
दाटेत नानाविध राजवीथी, । आरातिकें घेऊन भक्त येती. ॥ ५६ ॥
क्षणैकसा कृष्ण तटस्थ राहे, । त्या कुंडिनाचे रचनेस पाहे, ॥
कटाक्ष विक्षेप करी हरी तो, । पौरांगनांचीं हृदयें हरी तो. ॥ ५७ ॥

पुरात जेव्हां यदुनाथ आला । आनंद सर्वां वनितांस जाला. ॥
पहावया येति कितेक दारा । घरामधें ह्या न निघेच वारा. ॥ ५८ ॥
लागेत जावा वहु दार वेडे । परस्परें लोटिति बाहुदंडें. ॥
धरून सर्वत्र महाउपेक्षा । करीत कृष्णागमनप्रतीक्षा. ॥ ५९ ॥
येकींपुढें धावुनि येकि जाती । येकीस येकी धरिताति हातीं. ॥
येकीस येकी ढकलून देती । येताति येकीवरि येकि दाता. ॥ ६० ॥
धावोन येती कितियेक न्हाता, । बाळास कोणी स्तनपान देता. ॥
उगाळिता चंदन येती कोण्ही, । अर्धाच कोणी उकलून वेणा. ॥ ६१ ॥
वाढावया ओदन नेतनेता. । धावेति कोण्ही जळ देतदेता. ॥
उठेति कोण्ही उटि घेतघेता । नेत्रांबुजीं अंजन लेतलेता. ॥ ६२ ॥
संभ्रांत अत्यंत कितेक जाल्या, । भूषा विपर्यास करून आल्या ।
घालून पायीं करकंकणाला । पादांगदीं शोभविती कराला. ॥ ६३ ॥
नाकीं गळ्या, सरळ्या कर्णदेशीं, । ताटंकातें गोंविती केशपाशीं, ॥
दंडीं कंठे, बाजुबंदास कंठीं, । लेती, माजीं हार, तांईत, वेटी ॥ ६४ ॥
मुखकमळें उटुनि कुंकुमानें, । नयनयुगें भरिजेति चंदनानें, ॥
अधर सजविताति अंजनानें, । कृतविपर्ययदशा निरंजनानें, ॥ ६५ ॥
पहावया कौतुक सर्व आल्या, । श्रीकृष्णरूपास भुलोन गेल्या, ॥
आंदोळती मन्मथसिंधुकल्लोळें । उगीच होती श्लथ हे दुकूलें. ॥ ६६ ॥
घालून पायीं मणिनूपुराला । चढेति गाळा निज गोपुराला. ॥
मुखांबुजीं रोधिति ज्या झरोके, । कटाक्षपाशीं हरि आजि रोख. ॥ ६७ ॥
माड्या, अटाळ्या आणि उच्च भिंती । व्यापून कित्येक उभ्या रहाती. ॥
प्रासाद नारीमय सर्व झाले, । अनेक संदेह पडो निघाले. ॥ ६८ ॥
देवांगना या उतरोन आल्या । विद्युल्लता कीं झळको निघाल्या. ॥
भासेत किंवा स्मरवैजयंती, । प्रतिक्षणीं चंचळ रूप होती. ॥ ६९ ॥
चालेत हे न्यून कोटि रत्नें । सर्वामध्ये श्रीहरि मुख्य भासे. ॥
त्या तारकांला अति दिव्य आभा । तथापि चंद्रास विशेष शोभा ॥ ७० ॥
न्याहाळिती कृष्णपदारविंदा । म्हणेति आलास वध मुकुंदा. ॥
कित्येक येती वनिता वळाया । लागेति कोण्हीं वचनें वदाया ॥ ७१ ॥

"हा देखिला यादवराय जीणें । जालें त्रिजें सार्थक आजि जीणें. ॥
नीराजिजे मन्मथकोटि जेथें । सौंदर्यता वर्णन काय तेथें. ॥ ७२ ॥
करून शाई उघडीं कवाडें । हा पाहिजे कृष्ण बरा निवाडें. ॥
हा पाहिलाही पुरता पहावा । न पाहतां हा अनुताप व्हावा. ॥ ७३ ॥
पुढें नुद्धी व्हा, अति डोळसां गे । मार्गे फिरा जा अति साळसा, गे, ॥
जाला महा सौख्य सुकाळसा गे । उभा न राहेच अमाळसा गे!" ॥ ७४ ॥
म्हणेत "हा या समयास आला । पूजाप्रसंगें मधुपर्क जाला. ॥
होणार हें काय असें कळेना । दुर्बुद्धि रुक्मी सहसा वळेना. ॥ ७५ ॥
दैवें मिळे हा द्विज योग्य जोडा, । परंतु आहे अवकाश थोडा. ॥
हें आमचें पुण्य उभें रहावें, । दोघांजणा सत्वर ऐक्य व्हावें. ॥ ७६ ॥
हा कृष्ण काळा अति गौर बाळा । सयोग शोभेल अपूर्व मोळा. ॥
रत्ना सुवर्णी जरि भेटि होते, । परस्परें कांति विशेष येते." ॥ ७७ ॥
इत्यादि संवाद करीत नारी । तटस्थ पाहेत पहा कुमारी. ॥
पुढें पुढें श्रीहरि चालियेला । प्रासाद वैदर्भिक देखियेला. ॥ ७८ ॥
चढेत कोण्ही, उतरेत कोण्ही, । पडेत बाटेत गळोन वेणी, ॥
सिंजारवें व्याकुळ सौध जाले, । निर्जीवही जीवदशेस आले. ॥ ७९ ॥

अलर्यपदया ही त्वरित बहु धांवेति अवला,
अनभ्यासें मार्गी स्खळण पति पावेति विकळा. ।
वसे त्यांची तेथें अविरत मनोवृत्ति अवघी,
जयाच्या दासांचें अनिश करिती दास्य चवघी. ॥ ८० ॥
स्वरूपें कृष्णाच्या अविरत जिचें मानस रुचे,
तये वैदर्भीसी मग सहचरी येउनि वदे. ।
महा रथ्यामार्गे अभिनव युवा जात असतां,
निजप्रासादाग्रीं चढति सकळा राजवनिता. ॥ ८१ ॥
कटाक्षांची छाया घनतर सये ज्यासपडली, ।
विधात्यानें ऐसी अभिनव असे मूर्ति घडली. ।
असे हा कोणाचा कवण मजला तत्व न कळे, ।
अये, ये भूलोकीं कवण तरुणींचे तप फळे. ॥ ८२ ॥

न बोले कांहींही मुकुलितमुखी, कुंदरदना, ।
चमत्कारें बाळा झडकरि उठे मंदगमना. ॥
निवारी सर्वांतें करकिसलय वारिजमुखी ।
सयेची हे हांसे पदर वदनीं लाउन सखी ॥ ८३ ॥
पहाया वैदर्भी मग उपरमाडीवरि चढे ।
अनायासें प्रत्युद्गमन विधि किंवा तिस घडे ॥
करें छत्रच्छाया करुनि, वदनीं चंद्रवदना ।
न्यहाळी कृष्णाचें मुखकमल सारंगनयना ॥ ८४ ॥
जिवाचा सांगाती निजनगररथ्या प्रविशला, ।
तिला वाटे चिंतामणिच निधि किंवा गवसला ॥
नमस्कारें बाळा करुन परती ती सहचरी, ।
कटाक्षप्रक्षेपें यदुपतिस नीराजन करी ॥ ८५ ॥
मनामध्यें जीच्या प्रणयरस हेलावत असे, ।
मुखें बाळा कांहीं प्रकट परि हे बोलत नसे. ॥
अलभ्याच्या लाभें परम हरिखे नीरजमुखी ।
भयें या वधूच्या हृदय परि याचें धुकधुकी ॥ ८६ ॥
समारंभें गेला मिरवत पुरामाजि हरी,
न राहे पाहातां तदपि नृपमूर्धन्यकुमरी, ।
स्वरूपीं ह्या साक्षादनुभव महा होय जिजला,
अहो आला गेला म्हणुन म्हणणें काय तिजला. ॥ ८७ ॥
अहो खासा राहे यदुतिलक अंबापरिसरा
अनुज्ञेनें सेनापति उतरती स्वस्वशिबिरा ।
विदर्भें सर्वांचें अतिशयित आतिथ्य करिजे
पदीं श्रीकृष्णाचे दृढ परम हा भाव धरिजे ॥ ८८ ॥
घालून सख्य मग अंबिकेला । राजा विदर्भेंद्र घरास आला ॥
सक्रोध रुक्मी तव फार झाला । द्विजामध्यें वाच्य वदों निघाला. ॥ ८९ ॥
पुरोहित च्छांदस फार भोळे, । उगेच हातीं मिरवा कचोळें. ॥
प्रसंग याला सहसा कळेना । सगीतिल यास कदा कळेना ॥ ९० ॥

पाचारिल्यावांचुन मूढ आले । हे गोंवळी तों विचळोन गेले. ॥
आतां तुम्ही वांवदी हे करावी । कन्या नृपाची उजवून घ्यावी. ॥ ९१ ॥
कृष्णाकडे सोंवति मायबाप । म्हणोन जाली मज शल्यरूप. ॥
दावा मनीं उत्कट साधिवेल्या; । भुजंग हा केवळ आणियेला. ॥ ९२ ॥
जे जे पदार्थ उपयुक्त विवाहकर्मी । ते आणवी त्वरित राजकुमार रुक्मी, ॥
जों ज्योतिषी त्वरित लग्नघटीस घाली । तों सन्मुख प्रलयसूचक दिक जाली.॥९३॥
येतां मेळे वैदिकांपंडितांचे । होती तेथे वाद त्या तार्किकांचे. ॥
येता जाला मंडपीं दाटि केली, । होतां ज्यांच्या या वृथा घालमेली.॥९४ ॥
म्हणेत कोण्ही मधुपर्क आणा. । म्हणेत कोण्ही नवरीस न्हाणा. ॥
म्हणेत कोण्ही वर सिद्ध जाला. । मागेत कोण्ही चवकास धेला. ॥ ९५ ॥
म्हणेत कोण्ही शुभलग्न पाहा. । म्हणेत कोण्ही उगलेच राहा. ॥
म्हणेत कोण्ही नवरी दिसेना, । कोण्हास कोण्ही नगहो पुसेना. ॥ ९६ ॥
आर्याकर्ता व्याकुळ फार जाली । उठोन माडीवरि माय गेली. ॥
म्हणे तिला "चाल; विलंब जाला; । जाली असे सन्निध लग्नवेळा." ॥९७॥

प्रभुवचनविलासें होतगे त्राव तैसा
अभिनव करिणीला अंकुशाघाव जैसा. ।
तदुपरि जननीच्या ते गळां हात घाली,
अभिमत जननीशीं वाक्य बोलें निघाली. ॥ ९८ ॥
"उगी राहें आतां बहुत वदतां ओठ सुकले,
नको बोलों कांहीं, अकथित मला ग्रंथ उकले. ।
अवो, तूं दैवाची प्रिय, परम अर्धांग हरिचें,
तुझ्या हातां आलें सहज निजसाम्राज्य घरिचें. ॥ ९९ ॥
बाळे, तुवां साहस थोर केलें; । हें द्वारकादैवत आणियेलें. ॥
वैकुंठिचा नायक जो मुरारी । तो आठवा हा अवतारधारी. ॥ १०० ॥
तुम्हांस दोघास्र पाड आहे. । पूर्वीच हे गोष्टि कळोन राहे. ॥
येथे जरी हा चुकता विधाता, । येता तयाच्या अपकीर्ति हातां. ॥ १ ॥
सुदेव त्वां चोखन पाठवीला, । मनोरथा घेउनि शीघ्र आला. ॥
आरंक हे अंमिळ रुक्मसंगें । निधान लाधे तुज दैवयोगें. ॥ २ ॥

माझ्या मनायोग्य घडोन आलें, । परतु दुःपासद येक जालें. ॥
जाऊन तूं नांदाया सिधुगर्भी । मी येकली राहिन ये विदर्भी ! ॥ ३ ॥
मागेल आतां मज कोण जेऊ । कोणास मा उत्तर आजि देऊ ? ॥
वाटेस माझी करिशील रती, । तू लागशी आजिपसून तती. ॥ ४ ॥
कठीण आहे स्थिति सासुऱ्याची, । पडे मला गोष्टि तुझ्या जिवाची, ॥
तूझे गुणीं न्यून कदापि नाहीं, । तथापि पाहें सिकऊंच काहीं. ॥ ५ ॥
भालथोली घालिती नित्य सासा । टाकू बाई नेदिती हा उसासा ॥
पोटागींची माय मी दूर जाले । लागे आतां नांदणें त्याजसालें. ॥ ६ ॥
प्राणेश्वराच्या अति मान्य माता । अलीकडे त्याहुन जाण आतां. ॥
तो सासरा साधु बहूत आहे । आर्तेत त्याचे उगलींच राहे. ॥ ७ ॥
असे तुझा दारुण जेष्ठ भावा । तू काय त्याच्या करिसी स्वभावा ? ॥
राहीं नको त्याजपुढें उभी गे, । तू सर्वदा तद्वचनास भीं गे. ॥ ८ ॥
करीत जा आदर त्या दिराचें । असोत जे माणुसही तिराचे ॥
तेथें असे गे तुज कोण साहे ? । तूं बोल त्याचे उगलेच साहे. ॥ ९ ॥
अखड गोपीजनवल्लभाचे । ते आदरीजेत समग्र भावे. ॥
ज्या लाडक्या लाव महाभिमांचा । तशाच त्या मानितजाय भाच्या.॥ ११० ॥
असेत तूझ्या नणदा अहेवा, । उगाच तूला करितील हेवा. ॥
लागेत जेव्हां तुजसी रुसाया । तू देत जा पाट पिढे बसाया. ॥ ११ ॥
असेत जे तूज बहूत जावा । विरोध त्यांसी न करीत जावा. ॥
त्यां आपलीं आवरिजेत मूलें । जे नित्य होती कलहास मूलें. ॥ १२ ॥
तू सर्व शृंगार करुन रात्रीं । आधीं पतीचें मन घेय हातीं ॥
त्याच्या वच्यानें अवघीं वरी हे । त्या वेगळा शत्रु तुझा घरीं हे. ॥ १३ ॥
ते स्वामिसेवा तुजला घडावी. । त्याची तुला आवडि आवडावी. ॥
त्याच्या मनासी मन मेळवावे, । त्या नित्य त्याचे मिळणीं मिळावे. ॥ १४ ॥
असे जरी तो प्रतिकूल तूसी । तथापि राहे अनुकूल त्यासी. ॥
असेल गे पूर्विल पुण्यठेवा । तरीच हा वल्लभ वश्य व्हावा ॥ १५ ॥
घरामधें होतिल सुष्टदुष्टें । तथापि तूला अवघीं वरिष्टें. ॥
उगेन त्यांचे गुण नित्य घ्यावे । ते बोलता आन कदा न द्यावे. ॥ १६ ॥

टाकून बाई अभिमान यावा. । संसार हा गोड करून घ्यावा. ॥
सुखास येति जरि शब्द मोठे । तुझ्या गुणांचें तरि मूळ तुटे. ॥ १७ ॥
बोलोन जाशी जरि वांकडेंसें, । पडेल तुटें तुज सांकडेंसें. ॥
ऐका तुझ्या या तरि गोड बोलें । ते वश्य होतां अवघेंच कोडें. ॥ १८ ॥
तूं हा अहंभाव अनोप सांडीं । पदोपदीं त्यां धरिजेत वांडीं ॥
वाढेल या ढंग उगाच जेव्हां । पुसेल तेथें तुज कोण तेव्हां ? ॥ १९ ॥
त्यां आपला चालवितां परोपा । धरूं नये किंचित मात्र लोभा. ॥
तसें अनासक्तपणें असावें । जळीं जसें पद्मदळें वसावें. ॥ १२० ॥
छाश्चात वासल्य न दाखवावें । प्राणेश्वराचें मन वोळखावें. ॥
माझें तुझें हें म्हणशील जेव्हां । परस्परें तूटि पडेल तेव्हां. ॥ २१ ॥
हा सोयरा कवळ पांडवांचा । जो दाहकर्ता हरि खांडवाचा; ॥
कृष्णा सुभद्रेहुन आवडाची । मैत्री तिशीं हे तुजशीं घडावी. ॥ २२ ॥
संसार हा बुद्बुदरूप आहे. । तो स्वामि तूं ईश्वररूप पाहें. ॥
संसारकृत्यीं तुजला नयोडे. । त्या वल्लभावांचुन कोण वोढे. ॥ २३ ॥
संसार हा यद्यपि सत्र आहे, । तथापि सांगें गुज ऐक पाहें. ॥
मिळोन जावें मन दंपतीचें । तरीच घेती सुख संततीचें. ॥ २४ ॥
आहेसि तू वों अतिसाहसी गे, । त्याचे फसे कैतव साहसी, गे. ॥
करी हरी आदर गौळणीचा । कराव त्यां त्या म्हणिजेति नीचा ? ॥ २५ ॥
प्रगल्भता येथुन आदरावी, । हे लोकलज्जा हृदयीं धरावी. ॥
लोकापवादास बहूत भ्यावें । यकून चित्तातुन पाप यावें. ॥ २६ ॥
असेस तू सुंदर फार गोरी । पापास राहें परि पाठमोरी. ॥
स्वशीळ सरक्षिसि नित्य बाळे, । तरीच तूझा पति तूज भाळे. ॥ २७ ॥
ज्या सासुरां वर्तति गे उघड्या । जनांत त्यांचा बहु होय तटा. ॥
नांदेति ज्या गे सुलज्जा, विनीता, । सर्वांमुखीं त्या अति कीर्तिमंता ॥ २८ ॥
सर्वांपुढें सत्वर त्वां उठावें. । ते नीजल्या नतर त्वां निजावें. ॥
आदासपर्यंतहि अन्न द्यावें । त्यानंतरें भोजन त्वां करावें. ॥ २९ ॥
त्याच्या घरातील समस्त राण्या, । रांधून वाढून महा शहाण्या. ॥
पट्टांगना राजशिरोमणींची, । होयीं नवी अग्रणि सुग्रणींची. ॥ १३० ॥

त्या वागता पल्लव नीट घ्यावा, । पाचारिल्या मंजुळ जाब द्यावा. ॥
तू खालती पाहुनि नित्य चाले । तू बोलवील्याविण गे, न बोले. ॥ ३१ ॥
नेसे बरें उत्तम वस्त्र तैसें । माने पतीच्या हृदयास जैसें. ॥
माने तया भूषण तेच ल्यावें, । सेवेसि त्याचे परि चित्त द्यावे. ॥ ३२ ॥
लावीत जा कुंकुम नित्य भाळीं. । सौभाग्य सत्सूचक सर्वकाळीं. ॥
घालीत जा कज्जळ नित्य डोळा । शिकें वय तेंगिळ सर्व मोळा. ॥ ३३ ॥
सदा शुचिस्मित तुवा असावें । सदा सर्ताससविध, गे वसावें. ॥
जे उम्बऱ्याबाहिर पाय टाकी । ते आपला लौकिक काय झाकी ? ॥ ३४ ॥
धम्मिल्ल अधतमरूप भासे । चंद्रेंदु नक्त दिव हा प्रकाशे ॥
म्हणोन तूझीं स्तनचक्रवाकें । कूर्पासका आड दडोन थाकें ॥ ३५ ॥
घालीं गळा रत्नजडीत गाठी । देऊ नको भ्रूयुगुळास गाठी. ॥
प्रसन्नता हे वदनीं असावी । तरीच लक्ष्मी सदनीं असावी. ॥ ३६ ॥
सन्मान सर्वा वडिलास द्यावा, । कुलीन हा शब्द म्हणोन घ्यावा. ॥
न घेसि पैशून्य कदापि कानीं, । तरीच तूझें यश लोक वानी. ॥ ३७ ॥
तूं सकटीं हा निजधर्म राखें । कदापि ससारसुखें न मानें ॥
तत्काळ घालीं अतिथीस भिक्षा । पतिव्रताची तरि हेच दीक्षा. ॥ ३८ ॥
कधींमधीं तू मज आठवीं, गे, । त्यासारिखे आत्मज आठवीं गे. ॥
उत्कृष्ट येकाहुन येकयेकी । तथापि तू वासिल स्नेह सेकी. ॥ ३९ ॥
त्या सासुरा उत्तम नादिजे ते । पतिव्रतासाधन साधिजे तें. ॥
अर्धा तुझी येईल कीर्ति जेव्हा, । मला महा भूषण होय तेव्हा. ॥ १४० ॥

कुपात्रची सारी समज अवघी संपति असे.
शहाणे हे कोणी न धरिविच यांचे भरवसे. ।
अयो, जों जों ज्यावें तवरि करिजे हात वरता
पहा हा विश्वात्मा तरिच पुरवी देव पुरता. ॥ ४१ ॥
अये, ये लक्ष्मीची तिळभरहि तृष्णा न धरिजे,
यिच्या त्या या वेचेकरूनच यिची वृद्धि करिजे. ।
सुते, जों जों हातें करून विहिरा हा उपसिजे,
पहा तों तों तेणें पुनरपि यथापूर्ण भरिजे. ॥ ४२ ॥

समस्तां भूतीं त्वां निरुपम दया नित्य धरिजे,
    भुकेले, तान्हेले, दशिमुखि, विशेषें समजिजे. ।
विलासें लक्ष्मीच्या स्वसुहृद वगां न विसरिजे
    अनाथा दीनांचा निशिदिन परामर्श करिजे. ॥ ४३ ॥

प्रसंगीं ये देवद्विजचरणनिष्ठा, शुभ असो,
    असत्याचा, बाई, तिळभरि घरीं संग्रह नसो. ।
असत्यें हें पाहें अखिलहि महापातक जडे,
    जगामध्ये तैसा सहज निज विश्वासहि उडे. ॥ ४४ ॥

उपेक्षाबुद्धीनें विचर, चतुरे, संसृतिमुखीं
    नको लागों देऊं किमपि, विमले, पातक नखीं, ।
नको राहों देऊं परुषवचनोच्चारण मुखीं,
    अये, या दुर्दोषेंकरून तुटती सर्वहि सखी. ॥ ४५ ॥

तुला ये स्वप्नींही क्षणभरि असत्संगति नको,
    सदा या सत्संगें करूनच अहोरात्र दरको ! ।
असो, ये संसारींहुन हळुहळू चित्त विरमे,
    रमेच्या भर्तारीं सरिच उगलें जाऊन रमे. ॥ ४६ ॥

स्वभावें ही वार्ता परसदन वाली करूं नये,
    मनोवाचाकायें परपुरुषइच्छा धरूं नये. ।
पतीचे ये पाईं दृढतर धरीं भक्ति बरवी,
    पतिप्रेमाची हे प्रकटच गुढी उच्च उभवीं ॥ ४७ ॥

असो या नौघांच्या सज अनुमतें चालसि जरी,
    प्रपंच्यामध्यें या किमपि न पडे अंतर तरी ।
सहाणी तूं पोटांतुन शिकविलें काय तुजला
    असें त्वां वर्तावें निपट न लगे बोल मजला ॥ ४८ ॥

असो येतां जातां उठत बसतां कार्य करितां
    सदा देतां घेतां वचन वदतां ग्रास गिळितां ।
घरीं दारीं चव्हेवरि रतिसुखाचे अवसरीं
    समस्तांनीं हृद्या लखुन मनश्चिंतन करीं ॥ ४९ ॥

निसर्गं स्वर्गंगापदकमल सौरभ्य धरिते
जिवें भावें ज्याचें जलधितनया दास्य करिते ।
असा हा हा लोकत्रयपति तुझा इच्छित असे
मला तों ये लोकीं तुजहुन सुते धन्य न दिसे ॥ १५० ॥
पवित्राही रामायणमय महाभारतकथा
निजस्वामीच्या या स्वजनभजनावाचुन वृथा ।
गुणोत्कर्षे जीचा प्रियतम असे वश्य जिजला
उषःकालीं तीचें पदयुग दिसो नित्य तुजला. ॥ ५१ ॥
मदें तारुण्याच्या कुलवति अहंकार न करीं,
विनीते वैदर्भी पतिवचन हावावरि धरीं, ।
पतीची हे सेवा निरुपम महा साधन तुझें
कुलस्त्रीला बाई पतिविण नसे दैवत दुजें. ॥ ५२ ॥
पतीच्या ये पायीं व्रत नियम दानें विलसती
सदा जेथें गंगादिक सकल तीर्थें निवसती ।
धरावी ते माथां पतिचरण सक्षालण जलें
जयाच्या संसर्गें तरति सकळ बांधवकुळें. ॥ ५३ ॥
तुझ्या या स्वामीचें चरित वदता वेद शिणती
कदा 'नेणा नेणों' शुक सनक योगींद्र म्हणती ।
सहस्रा तोंडाचा फणिपति धरी मौन स्थिमा
अचिंत्य श्रीकृष्ण प्रणतिनितदुच्छिष्ट महिमा ॥ ५४ ॥
प्रसंग हे बाई सहज पति निंदा जरि घडे
गळत्कुष्ठें जिव्हा निगत व्यथा होऊन सडे. ।
विहारीं आहारीं निज पतिस वर्जीत असती
पराधीं तत्कर्में प्रतिपळित सर्पीय दिसती ॥ ५५ ॥
पिसाटें स्वामीच्या पाठ पाट उमें तोंड मुरडी
अशी ते तों पत्नी नियत अपदा होय घरडी ।
उगीं वारंवार छिद्रिपतिमुखे जे फुरफुरी
अशी ते भेकी अगुत जन्मोजन्में घरघरी ॥ ५६ ॥

न वर्तसी हा विधि बोलिला गे, । त्या सासुऱ्यांचा तरि बोल लागे ॥
देऊन मातेवरि त्या शिव्यांला । म्हणेत हा वांस कशास व्याला ॥ ५७ ॥
तूं आजि येडजुन हाड होशी । चितावणें फार तुकोन जाशी ॥
अक्रोश अत्यंत करू नये गे, । प्रणाम अंत्रेत करुन ये, गे." ॥ ५८ ॥
असें जिला जें शिकवून माता । म्हणे "वल्ली सत्वर चाल आतां ॥
आरोपिलें बीज फळास आलें । सहाय तूझें तुज पुण्य जालें ॥ ५९ ॥
हा तूज शिक्षाविधि मात्र केला । सर्वांस यांत उपदेश जाला ॥
वर्तोत ऐशाच समस्त मूली । घरोघरीं मृण्मय जाण चूली ॥" १६० ॥
बोले तिची ते तिजसी कुमारी । "मोठ्या थळें येथ पहा नुरारी ॥
हा सर्व कारुण्य कटाक्ष तूझा । येथें नसे किंचित यत्न माझा ॥ ६१ ॥
जें जें मला तूं शिकवीस कांहीं । वर्तेन तैशी अनुमान नाहीं ॥
तूं सर्व माते समजेसि तत्वें । नसेच तूझीं वचनें कवित्वें ॥ ६२ ॥
माते चमत्कार अपूर्व पाहें । जगामध्यें वर्तत एक आहे ॥
मूर्खांपुढें काढुनि टेंकियेला । तथापि नाहीं यश ते गुनेला ॥ ६३ ॥
सासू गुनेला शिकवीत आहे । वर्ते कधीं आपण हें न पाहे ॥
कार्पण्य कारुण्य कटाक्ष लेशीं । पांडित्य हें सर्व परोपदेशीं ॥ ६४ ॥
हे तो नसे गे मज आजि चिंता । माझी असे लाज सदा अनंता ॥
माया महा–नाटक सूत्रधारी । तो आजि आहे मज अंगिकारी ॥ ६५ ॥
कल्पद्रु हा कल्पित मात्र देतो । चिंतामणी चिंतित पूरवीतो ॥
अकल्पिता चिंतित अर्थदाई । समर्थ लक्ष्मीपति शेषशायी ॥ ६६ ॥
निर्वाह कर्ता भगवंत आहे । घाढुनि जो यावर भार राहे ॥
संपन्न जो कीं सकळां पदार्थी । तो काय भाडील तया अनर्थी ॥ ६७ ॥

यदुपति–पदपद्मीं माय माहेर माझें,
मज निमित्त न व्हावें चित्त हें व्यग्र तूझें ।
सहजच वळयमात्रारित्या पाठिराख्या
म्हणउनि कवणाचा हा असे आजि लेखा ॥ ६८ ॥

करूं नको खेद कदापि माता, । भेदें तुझ्या होइल खिन्न याता. ॥
घडे परामर्श कसा स्त्रियांचा । तुझा विवेकीं गुरु ते स्त्रियांचा ॥ ६९ ॥

असे प्रजापालन धर्म मोठा, । तुम्हांस तो याहुन अन्य खोटा; ॥
घडे प्रजापालन नित्य जेथें । हें ऐहिकामुष्मिक सर्व तेथें. ॥ १७० ॥
दयानिधि श्रीहरि शीघ्र आला, । म्हणोन माझा वरि बोज जाला. ॥
होणार तो होउन अर्थ जातो, । मागें पुढें हा उपहास होतो. ॥ ७१ ॥
हे सर्व बाहेरिल सिद्धि जाली, । घरामधें यावरि गोष्टि आली. ॥
त्यां, काय, माते उगऊन द्यावें ? । कळेल तें यावरि त्वां करावें. " ॥७२॥

तव्हां ते मातेनें सकरुणकरें क्षरि धरिली,
तयेचे ते मांडीवरुन मग खालें उतरिली. ।
भुजिष्येच्या बंकेकरुन विनवी प्राणपतिला
करावें देवाचें झडकरि तुम्हीं दर्शन पिला. ॥ ७३ ॥

सभेमध्यें राजा प्रकट मग हें बोलत असे,
"पिला तेथें नेणें परम मज आवश्यक दिसे. ।
न केल्या हें ऐसें नियतच कुळस्वामिनि खिजे,
अहो जाल्या आतां तुरुत नव तें विश्व उपजे." ॥ ७४ ॥

पित्याचें हें जालें वचन गरळप्राय तनया,
हरिद्रोहें मोठा उपजत घडे नित्य अनया ।
हरिद्वेषें ज्याला जनकजननीद्रोहच घडे
तयासाठीं कैसें विविध निरयद्वार उघडे ? ॥ ७५ ॥

कथा हे कृष्णाची सकळ जगदानंदजननी.
मनोभावें ईचें श्रवण करिजे नित्य सुजनीं. ।
प्रसंगें श्रोत्यांचे सकळहि महा दोष हरती;
यदूत्तस प्रेमें विषयरस गोडी विसरती. ॥ १७६ ॥

इति श्रीमद्भगवद्भक्तपदानुरक्तकविसामराजविरचिते रुक्मिणीहरणकाव्ये
रुक्मिण्युपदेशो नाम सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

## सर्ग आठवा.

रुक्मी पित्यासन्मुख नीट येथे, । निघेत वक्रांतुन शब्द तैसे ॥
स्फुल्लिंग जे केवळ पावकाचे । उठेति किंवा गण सायकांचे. ॥ १ ॥
"लग्नप्रसंगीं, जगदेकपाळा, । हें घोड ये काय पित्या कपाळा ? ॥
देवी स्वदेशांतुन आजि जाते, । किंवा पुढें दर्शनही न देते ? ॥ २ ॥
या ब्राह्मणां आणिक काय धंदा ? । म्हणेल हो या दमडीस वंदा. ॥
वाटे तरस्या बहु फार यांची, । हातांकडे केवळ दृष्टि ज्यांची. ॥ ३ ॥
हे आमचे वेद समस्त येडे । पदोपदीं लाविती कर्म वेडें. ॥
हे धर्मशास्त्रें अवघींच खोटें । परस्परें घेति महा हिलाटें. ॥ ४ ॥
देवी कशाची ? कुळधर्म कैंचा ? । विचार आधीं पडला जिवाचा. ॥
येकीकडे वृद्ध उभा रहाती, । माझा जिवाचा बळि आजि देती. ॥ ५ ॥
हा कृष्ण काळा अति कूटमंत्री । आसक्त झाली नरवीरपुत्री. ॥
चोला फुला गांठि पडेल जेव्हां, । तूं काय तेथें करिशील तेव्हां ? ॥ ६ ॥
जळामध्यें लोटुनि कां न द्यावी ! । हुताशनीं आहुति या करावी. ॥
परंतु बाहेर न पाठवावी, । हे गोष्टि माझी एक आयकावी. ॥ ७ ॥
बोलावल्यावांचुन येत पाहे, । कसा बकध्यान धरून राहे; ॥
कदापि यांचें मत हें कळेना; । अंबालयापासुनि हा ढळेना. ॥ ८ ॥
व्याघ्रापुढें आपण गाय जाते, । ते मागुती काय फिरोन येते ? ॥
जे सापडे व्याधकरीं कुरंगी, । मिळे कधीं ते निजयूथसंगीं ? ॥ ९ ॥
कदापि हे होर्पड हो न. द्यावी ! । मागें पुढें दृष्टि चहूंच द्यावी. ॥
तूं नेदिशी जीव मला फुकाचा । कळेल आतां परिपाक याचा. ॥ १० ॥
पूर्वी मशीं बोलिल काय जाशी । कृष्णाकडे संप्रत डोल देशी ? ॥
निर्वाह तूझ्या वचनास नाहीं; । या सांजिवा नित्य विटाळ पाहीं. ॥ ११ ॥
स्त्रीतुंदियोगें मजशी पडेना, । आरंभिलें कार्य सिरां चढेना. ॥
स्त्रीबुद्धि हे नित्य अनर्थकारी, । गवानिसी कां उगलीच कारी ? ॥ १२ ॥
हा आजि तूझे नगरीं न राहो, । आला असे केवळ तूज राहो. ॥
कसास हा दाढ तुझास व्हावा ! । संमार्जनीचा गुण हा पहावा. ॥ १३ ॥

भ्रिरांमध्यें हा नसता सराटा, । हा पांडवांचे घरचा घरटा. ॥
संपत्ति हे झाडुन सर्व नेली, । त्या पांडवांला मिळु त्यावियेली." ॥ १४ ॥
वाचाट हा चाट वदोन राहे, । औद्धत्य राजा सहसा न साहे. ॥
सानंद निंदा करिजे पित्याची, । होईल येणें गति काय त्याची? ॥ १५ ॥
राजा म्हणे "निंदिसि आदिदेवा । जळो तुझी पातकरूप जिव्हा. ।
उगाच तू जासिल नित्य गर्वें, । कर्मे तुझीं हे विपरीत सर्वें ॥ १६ ॥
तू काढिसी या नसत्या कुमुष्टी, । हा गौण पाहेहि सवकू दृष्टीं? ॥
घालीन पृथ्वीतळ पालथें मी । जाणेस कैसें मज आजि, रुक्मी? ॥ १७ ॥
विकत्थना का करिसाल येथें? । न आडले हा पुरुषार्थ देहीं. ॥
तू व्यर्थ माझ्या उदरास येसी, । संरामध्यें हीर म्हणोन घर्मी! ॥ १८ ॥
असेल तू तो पितृमातृहंता, । अद्यापि तुझी न जळे अहंता. ॥
दाऊ नको तोंड कदापि आतां, । लज्जा न वाटे मज जन्म देतां? ॥ १९ ॥
तू देवतादर्शनविघ्नकारी । होशी कसा पैन्यपदाधिकारी? ॥
ये पुत्रहत्येस कदा न भीतों, । राज्ञीकडे केवळ, रे, पहातों." ॥ २० ॥
वैदर्भ निर्भर्त्सुन बोलियेला, । तो उत्तरीं पुत्र जळोन गेला. ॥
निघे मुखाबाहिर काय वाणी. । जो विंधिला केवळ शब्दबाणीं? ॥ २१ ॥
उठोन तो जाय, पडे विचारीं, । पाचारिले स्वीय मतानुसारी. ॥
मुख्यप्रधानाप्रति काय बोले. । "हे आतहीं लोक अनाथ झाले. ॥ २२ ॥
उल्लंघ हे मानवकर्मरेखा, । आरंभिलें हे विपरीत देखा. ॥
हे गोवळी कोठुन आजि आले? । येतायकीं चक्र फिरोन गेलें! ॥ २३ ॥
घरामध्यें हा गृहभेद जाला, । प्रयत्न हा वाहता सर्व गेला. ॥
जेथें घरापूनच आगि लागे । कोणाकडीं धाउन कोण सांगे? ॥ २४ ॥
दारा गर्भा सर्पिलि मायबापें, । कृष्णाकडे बोलसि पापरूपें. ॥
हा पोटिंचा पुत्रहि दूर जाला । असा पहा कलिधर्म आला! ॥ २५ ॥
कृशोदरी, सुंदर, सोदरी ते । जे शामळा गोवळ आदरीतें, ॥
सुलोचना पाचन वोढ मध्या । नव्हेल कैसी मज आजि वध्या? ॥ २६ ॥
अद्यापिही एक उपाय आहे, । म्हणोन जो हा समजोन राहे; ॥
खोहून हे पार्ट कळा न दीजे, । प्रयत्न हा आमरणान्त कीजे. ॥ २७ ॥

देवें पुरत्वाहिर घोर राहे; । पुरामधें हा शिशुपाळ आहे. ॥
आतां कपाटें अवधींच देऊं, । वळें तिला आणुन लग्न लाऊं. ॥ २८ ॥
हे गोष्ट चित्तावरितीं धरावी, । परस्परें फूटि पडों न द्यावी. ॥
हा आडवा येईल कोण पाहों, । युद्धासही नीट उभेच राहों. ॥ २९ ॥
सहाय हा मागध आजि आहे, । आम्हाकडे पावारे कोण पाहे? ॥
जो नित्य साह्य तरवार मारी, । तयापुढें काय टिके मुरारी!" ॥ ३०
विचार एवंविध काढिलेला, । सर्वांसही सम्मत तोच झाला. ॥
करून देव्हां घरिच्या अराधी, । ते मूळ जाती अवघे वराती. ॥ ३१ ॥
विचार हा सांगति चार तेथें, । राजा वसे राजसभेत जेथें. ॥
विचार निःसीम नृपास आला, । सेनापतीशीं मग बोलियेला: ॥ ३२ ॥
"सेना सवें हे अवघीच घ्यावी, । अंबालया रुक्मिणि शीघ्र न्यावी. ॥
सेनेमधें सावधरूप राहें, । ईचा घरांतीलच शत्रु आहे. ॥ ३३ ॥
आज्ञा तयानें बहु वंदियेली, । समग्र सेना मग सिद्ध केली. ॥
चहूंकडे दुंदुभिघोष गाजे, । सेनासमूहें दरबार साजे. ॥ ३४ ॥
स्वधर्म भूमीपति हा न सोडी, । तो आपली हे करि हो न मोडी. ॥
दोघांमधें ताळ पडोन गेले, । ये भीमकीचें परिकार्य जालें. ॥ ३५ ॥
राजांगना वाट पहात होती, । फिरोन आली तंव तेच दूती. ॥
वृत्तांत जो तेथिल देखियेला, । तो बीजराशीच निवेदियेला. ॥ ३६ ॥
न माय हर्षे, मग माय कोठें । तीच्या सख्यांचें उठऊन जोडें. ॥
येऊन तीच्या श्रवणास लागे, । हळूच श्रीआशर मन सांगे. ॥ ३७ ॥

निजानंदें बाळा सकपचित निःसीम निथळे;
असे झाला तो तों अनुभव तिचा तीसच कळे ।
अनेनें मातेसी प्रतिवचन किंचित्र वदली
स्ववश्यप्राप्ती हे त्वरित शकुनमांधि दिसली. ॥ ३८ ॥

तत्काळ ते राजस सिद्ध झाली, । सुवर्ण वृंदावन सव्य घाली. ॥
सुदेवनर्लीयुत पूजियेला, । प्रणाम मातापितरांस केला. ॥ ३९ ॥
दुर्वामयी मंगलपुष्पमाळा, । जे आणवी संवरणार्थ बाळा; ॥
करांबुजीं ते अतिगुण घेते, । आगुल्म माता तिस बुंथि देते. ॥ ४० ॥

स्मरोन विघ्नेश्वरमूर्ति तेथ, । सवत्स गोदान करून हात, ॥
पायींच विधे वरि चालियेली, । दौवारिकीं दाटणि वारियेली ॥ ४१ ॥
जाबूनदच्छत्र शिरीं विराजे, । मुक्ताफळस्तोम नयाम साजे ॥
दाहींकडे चामरधारिणींचा । संचार मध्य गजगामिनीचा. ॥ ४२ ॥
सभावतीं वत्सल माय भावें, । सव सन्याचा परिवार धावे ॥
चालेति दासीगण हे तुरस्ता, । हाता पुढें वेत्रधरा समस्ता ॥ ४३ ॥
वरें सखीचा नर घेय साता, । समागम सात सहस्र नारी ॥
डावीत डावेसम हा हत्यार, । करीत सवाहून युद्ध ग्यार ॥ ४४ ॥
अत पुरावाहिर दीम आली, । सिकेत नीच्या कळहंस चाली ॥
तथापि हे चचळ दृष्टि पाहू, । अत्यत दोलाचलवृत्ति आहे ॥ ४५ ॥
ता हा महासनिध चैद्य आला, । होणार आहे मधुपर्क ज्याला ॥
वार्ता जसी ये मग आयकीला, । तत्काळ गाळा उतरोन गेला ॥ ४६ ॥
हा धारदा राजकुमार जाला, । नपार ग्यथा विसरोन गेला ॥
सहाय जेथें भगवत आहे, । तेथें कदा विघ्न शिरो न लाहे ॥४७॥
सहस्र हस्ती हरि रक्षिता हा, । तयेकडे कोण अचेरिता हा ? ॥
नाका चुना लाउन न त आहे, । ज्याचें कुडें त्याचपुढेच राहे ॥ ४८ ॥
त्या पाठिसी चालती राजदारा, । नदाप ज्याला न लगेच वारा ॥
आंधाइती मुद्रि पालख्याला, । न देति वार्गा जन पारख्याला ॥ ४९ ॥
मध मध चालति वारसुंदर्या, । सुवासिना धावति ल त सव्या ॥
वाजेत नानाविध सर्व वाद्यें, । पढेत नदी स्तुतिरूप पद्यें ॥ ५० ॥
ते लोक राखे जवळाल मार्गी, । आरूढ त ज्यावार शस्त्रधारा ॥
सभोंवते चालति ते शिपायी, । हे जाललेंसे सुकुमार पाया ॥५१॥
त्याभोंवता सज्ज पदातिफेरा । त्या भोंवता स्वारसमूहघेरा ॥
त्याभोवते हे रथ थाट चाले, । त्याभोंवते मत्त गजेंद्र काळे ॥ ५२ ॥
त्याभोंवतीं केवळ वीरहर्ष, । चालेत ज्यांला शरटे स्वदत ॥
वसेत साहाकार दाट, पाहीं, । पिपालिकेला परि माग नाहा ॥ ५३ ॥
अपार सनाणव चालिलासे, । सेनाभरें शेषहि हालिलासे ॥
महापुरद्वारहि गारियेले, । तत्काळ अवाल्य पाहियेले ॥ ५४ ॥

मुकुंद-पदांबुज ध्यानशीला, । राहे उभी बाहिर गूढलीला. ॥
जे पाणिपादांबुजयुग्म धूते, । गंगोदकें आचमनार्थ घेते. ॥ ५५ ॥
देवालयीं दाटणि देखियेली, । ते वारिजें सत्वर सोडियेली ॥
प्रवेशली त्यावरि राजपुत्री, । प्रफुल्लपंकेरुहपत्रनेत्री. ॥ ५६ ॥
ठेवी तयेचे चरणाब्ज माथां, । आधार जे केवळ या अनाथां, ॥
अपारसंपद्रचना विधात्री, । कटाक्षमात्रें करि मोक्षदात्री. ॥ ५७ ॥
माता तिच्या तीजसमीप आल्या, । प्रणाम देवीस करूं निघाल्या. ॥
सुवासिनी दाटति त्या अपार । करीत दाटी बहु येरतार ॥ ५८ ॥
अगस्तिपत्नी आणि अत्रिपत्नी, । पतिव्रता मुद्गलधर्मपत्नी. ॥
अरुंधती श्रीजनहृंदवृंदा, । पतिव्रतांमाजि अतिप्रबुद्धा. ॥ ५९ ॥
पतिव्रतामंडन गौतमाची । जाया अहिल्या मुनिसत्तमाची, ॥
मिळोन इत्यादिक सर्व आल्या, । यथोचित स्वागत देववील्या. ॥ ६० ॥
गंधर्वविद्याधरचारणांचे । येती थवे गुह्यकगायकांचे ॥
वाजेत ते ताळ, मृदंग, भेरी, । देवीपुढें नाचति वारनारी. ॥ ६१ ॥
शुभासनीं रुक्मिणि बैसलीसे । जे पीतपावांबर नेसलीसे. ॥
सख्या उभ्या राहति पृष्ठभागीं, । कुरंगनेत्रा, कुशला, शुभांगी. ॥ ६२ ॥
संभार देवीपदपूजनाचे । आणीत अप्रश्न वधूजनाचे. ॥
आरंभिजे अर्चन अंबिकेचें; । सौभाग्य मोठें नृप कन्यकेचें. ॥ ६३ ॥
सुदेवनामा मग शाहणीली, । सर्वांपुढें आणुन बैसवीली; ॥
साडी जरी हे परिधान केली, । सुवर्ण जे हें मण येक ल्याली. ॥ ६४ ॥
करीत सत्कार समस्त नारी, । सप्रेम, सादर होय कारी. ॥
जाली जिच्या राजगृहीं प्रतिष्ठा, । न होय अन्यत्र कशी वरिष्ठा? ॥ ६५ ॥
देवालय क्षीमय सर्व जालें, । की राज्य एकवचन या मिळालें. ॥
पुन्नाम कोठें श्रवणीं पडेना, । कोण्हीकडे मानस वावडेना. ॥ ६६ ॥
द्विजांगना पूजन तीस सांगे, । ते अर्चनीं श्रीपति मान मागे. ॥
जें जें क्रिये आवण मागिजेती, । ते तें सख्याही उपचार देती. ॥ ६७ ॥
पदांबुज ध्यान मनांत केलें, । सुवर्ण सिंहासन अर्पियेलें. ॥
सुगंधि पादारि पात्र घाली, । अनर्घ्य अर्घ्योदक सिद्धि जाली. ॥ ६८ ॥

समर्पिलें आचमनीय तोये, । सपादिलें जे गुरुसप्रदायें. ॥
मळापकर्षस्नपनीय वारी । निवेदिते त्यावरि राजकारी. ॥ ६९ ॥
पचामृतस्नानविधान जाले, । पृथक् पृथक् पूजन त्यास केले. ॥
विशेष सक्षाळण होय जेव्हा, । परस्परें विहुन जाति तेव्हा. ॥ ७० ॥
प्रवाळपीठावरि वैसवीली, । सुगध तैलें मग मारियेली, ॥
काश्मीरकस्तूरि समान भागे, । उद्वर्तिजे तत्तनु भक्ति योगें. ॥ ७१ ॥
सुवर्ण गगालय आणवीलें, । सुगधि ऊष्णोदक सारियेलें. ॥
करागुलीच्या अवकाश मार्गें । त्या तोयधारा पडती निसर्गें. ॥ ७२ ॥
अपार येती घट कांचनाचे । जे शुद्ध शीतोदक सेचनाचे. ॥
विधियुक्त तेणें अभिषेक केला, । तत्प्रोञ्छनीं हा उपयुक्त सेला. ॥ ७३ ॥
तदुपरि तिस अर्पी पीत चंडातकातें,
परम रुचिविशेषें लाजवी हाटकातें. ।
भरजर अवघी हे शाठिका नेसवीली.
धरुन करसरोजीं आसनीं वैसवीली. ॥ ७४ ॥
झळकति सज जेथे गोट हे सोनियांचे;
विलसति जव जाणे हे तसे मोतियाचे. ।
हरित तिस अशी हे कचुकी लेववीली.
मणिखचित नगाची पेटिका आणवीली. ॥ ७५ ॥
उघडुन मग काढी जे अळकार यत्नें,
वसति बहुत जेथें हे अमोलीक रत्नें. ।
तदुपरि तिस अर्पी ते यथास्थानदेशीं
पदयुग जननीचें आदरजे जिवेसीं. ॥ ७६ ॥
सौभाग्यसत्त्वक रुपमुद्रा । अर्पीतसे कुकुम हे हरिद्रा. ॥
घेऊनिया रुक्ममयी शलाका, । नेत्राबुजीं अजनलेखलेखा. ॥ ७७ ॥
कस्तूरिका, चदन, सारचोवा, । काश्मीरकर्पूर, बुका वहावा. ॥
सुगधि नानाविध पुष्पजाती । त्यानतरें तीस समर्पिजेती. ॥ ७८ ॥
तत्काळ काळागरु धूप दावी. । प्रसन्न पकार्तिक दीप लावी. ॥
नैवेद्य विस्तारुन रत्नताटीं । निवेदिला उत्तम तीजसाठीं. ॥ ७९ ॥

फळार्पणानंतर अर्पणीये । समर्पिलें शीत, सुगंधि तोयें. ॥
कर्पूरकंकोळलवंगयेळा- । समिश्र तांबूल निवेदियेला. ॥ ८० ॥
आदर्श हा रत्नजडीत दावी । पतद्ग्रही तीज समीप ठेवी. ॥
क्षणेक संवीजन ताळवृंते, । तत्पादसंवाहन होय हातें. ॥ ८१ ॥
सुवर्णकोटिद्वय दक्षिणा हे । वाहोन, मार्गे परतोन पाहे. ॥
सख्या तिच्या सर्वहि इंगितज्ञा, । संकेतमात्रें करिताति आज्ञा. ॥ ८२ ॥
आंदोलिका उत्तम वाहियेली । मुक्ताफळीं केवळ गुंफियेली. ॥
सुवर्णपर्याणित अश्व च्यारी, । सपार्पजेती गजराज भारी. ॥ ८३ ॥
सचामरच्छत्र, सुवर्णपादुका, । सुवर्णपर्यंक, सुवर्णदीपिका ॥
मृदूपधानान्वित हंसतूलिका, । समर्पिल्या ज्या उपयुक्त दासिका. ॥ ८४ ॥
कर्पूर, नीरांजन होय जेव्हां, । सहस्रघंटाध्वनि होति तेव्हां ॥
सुवर्णपुष्पांजळि वाहियेला. । प्रणाम साष्टांग तयेस केला. ॥ ८५ ॥
प्रदक्षिणा तीस करून आली; । पुढें उभी सन्मुख राहियेली. ॥
पुनःप्रणामांजळि जोडियेला. । सपूर्ण पूजाविधि अर्पियेला. ॥ ८६ ॥

अहो, लोपामुद्राप्रभृति अनसूयावधि सती
जयेच्या लक्षांशेंकरुन तुळने येत नसती, ।
अशी हे जे याळा मुनिवरमहामुद्गलवधू
वदे ते अंबेसी घवघवित जीचा मुखविधु ॥ ॥ ८७ ॥

"अपर्णे शर्वाणि, त्रिनयनगृहस्वामिनि, उमे,
कृपापांगें तूझ्या प्रणतजनचिंतानळ शमे. ।
मृदुस्वाते, शांते, जननि जगदंबे, भगवती,
करावें तां ऐसें शुभ अशुभ कर्मे जुगवती." ॥ ८८ ॥

नृपाची हे कन्या पदयुग नमस्कारित असे.
मनीं हा आनंदाधिप हरि इचे येउनि वसे. ।
भवानी, हा अस्मद्विधहृदयसंदेह पुरवीं
जगन्माते आतां सकळहि इचा हेतु पुरवीं ॥ ८९ ॥

विनतीनें जाली किमपि जगदंबा स्मितमुखी,
स्मितज्योत्स्नाजाळें निजनिलय जीचें लखलखी. ।

ऋषींचे पत्नीला निश्चय तदभिप्राय कळला.
म्हणे, " बाळे, तुझा सकळ मनिचा हेतु फळला. " ॥ ९० ॥
भवानीचे कंठींहून कुसुममाळा उचलिली.
इचे कंठीं घाली अतिमृदुळ जी हे मिरवली. ।
वहाती तन्माता त्वरित जव घेऊन अभिधा,
जनुशा अंबेची झडकरि निघे घेउनि तदा. ॥ ९१ ॥
पुरोभागीं जो हा अतितत सभामंडप असे,
अहो, बाळा तेथें हळुच मग हे येउनि बसे. ।
चिरटीचा नानाविधनिवह तेथें घनवटे.
कुमारींचा थोळाहळ बहळ तैसा मग उठे. ॥ ९२ ॥
सुवासिनी सन्निध आणवील्या; । पदांबुजें क्षाळुन बैसवील्या. ॥
वेण्या तयांच्या सज घालवील्या, । साड्या सवृपालक अर्पियेल्या. ॥ ९३ ॥
स्वयेंच ते देत असे हरिद्रा. । उटविती त्या निज वक्त्रचंद्रा. ॥
ते कुंकुमें उत्तम लावनीली. । हे पाउलें सुंदर रंगवीली. ॥ ९४ ॥
त्या कंठसूत्रांत अनेक भूषा । समर्पिते ते स्पृहणीयवेषा. ॥
फळेक्षु तांबूल सुवर्णपूर्णें । सूपें करी सिद्ध सुवर्णवर्णें. ॥ ९५ ॥
समर्पिते जे मग लक्ष वाणें. । करीत नारी तिथ अक्षवाणें. ॥
अशीच तेही तिहि पूजियेली. । ओटी तिची हे परिपूर्ण केली. ॥ ९६ ॥
माता समस्ता मग पूजियेल्या, । माथा पदीं ठेउनि वंदियेल्या. ॥
त्या तीस आशीर्वचनास देती. । म्हणेति, "तू होशिल पुत्रवती. " ॥ ९७ ॥
आली पुढें सोदरमुख्यजाया । ईच्या मनातील विषाद जाया. ॥
भाळीं तिचे कुंकुमबिंदु लावी. । म्हणे तिला, "तू असशी दुलावी." ॥९८॥
त्या देवकन्या आणि राजकन्या । पहावया कौतुक येति धन्या. ॥
त्या मेनकाआदिकरून मुख्य । करीत सेवा सुरवारमुख्या ॥ ९९ ॥
घालून मल्लीकुसुमें स्वकेशीं । तत्केशसंस्कार करी सुकेशी. ॥
वरुन मौनव्रत मंजुघोषा । ते लेववीते तिजला विभूषा. ॥ १०० ॥
तिलोत्तमा उत्तम पाय ऊटी. । अधोमुखी तीस न देय ऊटी. ॥
रंभा स्वदर्पास धरू न लाहे, । आदर्श घेऊन उभीच राहे. ॥ १०१ ॥

उपासना सन्निध उर्वशीला, । असे जिला वासव हा वशीला. ॥
वरिष्ठ सर्वांहून हे घृताची । ते वाट पाहे वचनामृताची. ॥ २ ॥
होऊन हा संभ्रम जाय जेव्हां । बाहेर कोलाहळ होय तेव्हां. ॥
तेणें तिचें व्याकुळ चित्त जालें; । सदेहसोपान चढों निघाले. ॥ ३ ॥
उठे त्यव्हां तेथुन ते शहाणी, । शिकेत जीच्या हरिणी पहाणी. ॥
पुसोन सर्वांस असे निघाली, । देवालयाबाहिर चालियेली. ॥ ४ ॥
तो घाबिरा होय भरोन धापे, । महाभयें ब्राह्मण फार कांपे. ॥
तो तांतडी धांवत वृद्ध आला. । म्हणे, "मुली, काय विलंब केला. ॥ ५ ॥
प्रसंग जाणोन न वर्तसी, गे. । असार कर्मीच प्रवर्तसी, गे. ॥
टाकून गोविंदपदारविंदा । आरंभिला हा नसताच धंदा. ॥ ६ ॥
अद्यापि चित्तावरि गोष्टि घ्यावी, । माया तुवां सोडुनि सर्व द्यावी. ॥
हे लाविल्यानें लिगटोन येते; । हे सोडिल्या दूर सुटोन जाते. ॥ ७ ॥
जे आतवर्गे म्हणशील मात्तो, । ते सर्वथाही नव्हतील तूझीं. ॥
आलीकडे हा जन सर्व राहे; । आत्मीय तो याहुनि भिन्न आहे ॥ ८ ॥
तूं गुंतसी, गोविसी कां निसांसी ? । या अंतरगा विसरोन जासी ॥
हे कोण आहे भवदीय दीक्षा ? । करी परब्रह्म तुझी प्रतीक्षा ॥ ९ ॥
स्वभाव तूझा बहु फार भोळा. । बाळे, विवेकांजन घालि डोळां. ॥
येथें उदासीनपणें रहातां । चढेल अद्वैत निधान हाता. ॥ ११० ॥
पडेल पायावरि दृष्टि जेव्हां, । कृतार्थ तू होशिल जाण तेव्हां. ॥
भाग्यास तुझ्या तरि पार नाहीं, । फिटेल हे लोचन पारणाही. ॥ ११ ॥
हे क्रोध, लोभ, मद, मत्सर चोळवावे. । वाचेकरून भगवद्गुण बोलवावे. ॥
आद्यादिकां सहचरींस त्यजून, बाई, । तू येकली त्वरित जाउनि लाग पायीं. ॥ १२ ॥
आणीकही परम विस्मय थोर आला । तो क्षत्रियाधम नरेंद्रगृहास आला. ॥
रुक्मी तयास मधुपर्क करीत आहे. । चाहीत तो दधि हताश तसाच राहे. ॥ १३ ॥
पूर्वेकडील आणि दक्षिण पश्चिमेचे । राजे, कितेक आन उद्धत उत्तरेचे ॥
सभद्रगजध्वजवळवाहनयुक्त होती. । अंबालयासहि मिळोन समस्त येती ॥ १४ ॥
ते आपले विविधभार रचीत राजे, । जे, भीमकी, तुज निमित्त पडेत लाजे. ॥
अत्यादित प्रकट उत्कट मांडियेले. । हें अंबिकानिलय येऊनि वेढियेलें. ॥ १५ ॥

हा द्वारकारमण, कृष्ण सहाय जेथें, । कोणापासुन उपजे भय तूज तेथें ? ।।
बाहेर तू त्वरित येवुन जाय, बाई. । हे त्या पुढें नृपति केवळ आण गाई. ।। १६ ।।
नरपतिसमुदायीं नेणसी श्रीपतीला. । त्वरित करुन जासी आपले ब्युत्पतीला. ।।
सहज नृप समाजामाजि जो देखणा, गे; । तदपि तुज तयाच्या सांगतों या खुणा, गे. ।। १७ ।।

अभिनव वनमाळा शोभते नित्य कंठीं,
अविरळ कुरळांची मस्तकीं बांधुटी, ।
वदननिहित वंशी, देखडे ठाण ज्याचें,
दृढतर तुज लागो सर्वदा ध्यान त्याचें ।। १८ ।।

मुररिपु घळसे जो कद नीळ्या नभाचा,
उदय हृदयदेशीं होय कौस्तुभाचा, ।
परम विमळ जेथें वैजयंती विराजे,
त्वरित वरि तयातें, सर्व टाकूनि लाजे. ।। १९ ।।

ध्वजस्तंभीं ज्याचे खगपति सदा राहत असे,
भुजद्वंद्वीं तैसे अविरत गदा, चक्र विलसे, ।
शिरीं पिच्छें बांहे, कटितटिस पीतांबर धरी,
जसा हा लक्षावा यदुपति, जगन्नायक हरी. ।। २० ।।

न लक्षे योग्याला अति तरळ ते लक्षिति कसें ?
करावेना यारी क्षणभरि मनीं चिंतन असे. ।
तयाची तू सत्ता, तुजविण तया सदन नसे,
तथापि प्रारंभ सहज तुज हें ब्रह्म गवसे. " ।। २१ ।।

बोलोन हें वचन विप्र सुदेवनामा
" स्वस्त्यस्तु ते " म्हणुन जात असे स्वधामा. ।
तेथेंच राहति उभ्या नरनाथनारी
रक्षीत जाति तिजला बहु वेत्रधारी. ।। २२ ।।

माता म्हणे, " नृपसुते, परतोन पाहें. ।
लोकांत हा विधि पुरातन, उक्त आहे. ।।
भाईन मी मुळ दिवाळिस तूज, बाई. ।
हा प्राण होर मजला तुजवीण कायी ? ।। २३ ।।

तो तों करील तुजला तळहातछाया.
माशी कशी मज सुटे परि आजि माया ?।
वृत्तांत दूरिल कसा मजला कळे, गे ?
याकारणें परम हा जिव जाकळे, गे. ॥ २४ ॥

तू आत्मजे, मज मनांतुन मोकलीसी.
जाऊं कसी स्वसदना परि येकलीसी ?।
ये कातरींत जिव आजि पडोन रादे.
' मातें ' म्हणोन तुजवांचुन कोण वाहे ? " ॥ २५ ॥

हें आयकोन पृथिवीपुरुहूतपुत्री
कोमेजली विकचपद्मपलाशनेत्री.।
बाहेर ये तदरि धीर धरून बाळा.
टाकी पदें हळुव कोमळ चारुशीला. ॥ २६ ॥

दोंहीं करीं सहचरींस धरून चाले.
चालेत धीर अतिदूर धरून भाले.।
दाटेत त्या निजसमीप अनेक दासी,
ज्या सर्वदा वसति केवळ तीजपासीं. ॥ २७ ॥

आज्ञापिती कितियकां परिचारिकांला,
अध्यापिती चतुर ज्या शुकसारिकांला.।
वाटेस वाटिति विडे, सगळ्या सुपाऱ्या.
रंभादिका दिसति ज्यांजपुढें बिचाऱ्या. ॥ २८ ॥

नाचेत त्या तिजपुढें बहु वारनारी.
दूती फिरेति कितियेक निवारणारी.।
वज्रावळी पडघ भाट अनेक जाती.
वाजेति त्या विविध सुंदर वाद्यजाती. ॥ २९ ॥

ते भीमकी सकळलोकमनोभिरामा,
वैकुंठनाथपदपंकजबद्धकामा,।
सौंदर्यसाररसनिर्मित मूर्ति जीची,
उत्कृष्टता परम याहुन काय तीची? ॥ ३० ॥

वक्त्रेंदु हा सहज सिंधु सुधारसाचा.
   याच्या धर्थी नियत इंदु उधार साचा. ।
आहे अनाच बहुधा अपवाद लोकीं.
   हा अन्यथा हरिणलांछन का कलंकी ? ॥ ३१ ॥
अत्यंत निर्मळ, अमोलिक, ज्या अभुक्ता,
   सीमंतसीमपदवीस वसेत मुक्ता, ।
साजे तसा निजवरा तिजला ललाटीं.
   रेखावलीयुत मनोहर हार कंठीं. ॥ ३२ ॥
शोभे तिचे मृदु भुजद्वय नागुरदीं.
   ते नीळ तेज'शळके हृदयारविंदीं. ।
हातीं तिचे सहजरत्नजडीत चूडा.
   त्या मुद्रिका सकळ अंगुलिकाधिरूढा. ॥ ३३ ॥
आकर्ण विस्तृत तिच्या विलसेत दृष्टी;
   तन्मध्य हा सहज सुंदर माय मुष्टी ।
तीचा महा रुचिर नाभि गभीर शोभे.
   वक्त्रांबुजीं भरम षट्पदवृंद लोभे ॥ ३४ ॥
ते भीमकीस खिसफूल शिरीं विराजे.
   नाकीं तिचे अति मनोहर मोर साजे. ।
पायीं तिचे जडित नूपुरयुग्म वाजे.
   यांचे गतीस गमनी गजराज लाजे. ॥ ३५ ॥
जे देवमाया, वरवीर मोहिनी,
   व्यंजतस्तनी, जे कळहंसगामिनी, ।
श्यामा, नितंबार्पितरत्नमेखळा,
   पायीं जिचे शोभति हेमशृंखळा. ॥ ३६ ॥
कृशोदरी, कुंडलमंडितेक्षणा,
   शुचिस्मिता, सुंदरि जे सुलक्षणा. ।
जे पक्वबिंबीफळसोदराधरा,
   ते होय वीरा मग दृष्टिगोचरा. ॥ ३७ ॥

क्रीडावलोकनविमिश्र तदीय हासा
देखोन, ते पडति वीर मनोजफांसा. ।
उत्साह जे बहुत थोर धरून आले
राजन्य ते परम मूर्च्छित सर्व जाले. ॥ ३८ ॥
हस्तांबुजींहुन गळोन पडेत शस्त्रें.
चित्रांपरि धरिती भूषण आणि वस्त्रें. ।
यानांवरून कितियेक पडेत खालें.
येकायकीं नृपतिमंडळ मुग्ध झालें. ॥ ३९ ॥
जों पावलें सकळ राजक हे अवस्था,
तों चालिली सहज वेधुन पद्महस्ता. ।
क्रुष्णार्पण प्रकट देह करूनि राहे.
ते भीमकी भगवदाप्तिस इच्छिताहे. ॥ १४० ॥
वारून वामकरजीं अलकांस, बाळा;
तैसें अपांगविशिखीं अपरां नृपाळां; ।
आलोकिते समय सादर अच्युतातें:
सव्रीड साचिवदना, पुरुषोत्तमातें. ॥ ४१ ॥
तें सांवळे, सगुण ब्रह्म कृपाकटाक्षीं.
सस्मेर तन्मुखसरोरुह हें अवेक्षी. ।
दृष्टीस दृष्टि जव नीट मिळोन गेली,
ते भीमकी हळुच त्याजसमीप आली. ॥ ४२ ॥
कीं चक्रवारकमणींच वियुक्त जाली
ते चक्रवाक उमगोतच काय आली? ।
कीं मानसा त्यजुन मानसराजहंसी
आसक्त हे परमहंसफुलावतंसीं ॥ ४३ ॥
कल्पद्रुमाजवळि जंगम कल्पवल्ली
कीं येय हे हळुच चालत पावचाली. ।
कीं चातकप्रणयिनीच निदाघ तप्ता
धांवोन ये नवघनाभिमुख नृपाप्ता; ॥ ४४ ॥

किंवा त्यजून विषयाकुरमात्रचारा
  मेध्या मृगी अनुसरे निज कृष्णसारा, ।
किंवा महोदधि गवेषित येय गंगा,
  कीं भेटली रतिच येऊनि या अनंगा. ॥ ४५ ॥

हे भीमकी सहचरींसहित त्रिवेणी,
  प्रत्यक्ष हा वटमहीरुह चक्रपाणी. ।
जेणें सुटे सहज हा भवबंध, राया,
  तो तीर्थराज प्रकटे जग उद्धराया. ॥ ४६ ॥

तत्काळ इंद्रियपराङ्मुख वृत्ति जाली,
  श्रीकृष्णमूर्ति हृदयीं विवरीं निघाली. ।
हारेन जाय मकरध्वज कोटिशोभा.
  पाहे न्यहाळुन तया मग पद्मनाभा ॥ ४७ ॥

चतुर्भुज श्यामळरूपधारी,
  जो शंखचक्राब्ज गदा उभारी, ।
उभा असे जो रणभूमिमार्गी,
  घेऊनिया चंदनउटि अंगीं. ॥ ४८ ॥

कंठस्थळीं कौस्तुभ दिव्य भासे
  मुखेंदु सानुग्रह मंद हासे ।
उत्फुल्लकंजोपमनेत्र दोन्ही
  ते कुंडलें हो झळकोति कानीं ॥ ४९ ॥

ते साजिरी उन्नत नीट नासा
  शोभा महा भ्रूलतिकाविलासा. ।
टिळा ललाटीं निट केशराचा
  वो बिंदु शोभे वरि कस्तुरीचा ॥ ५० ॥

धम्मिल्ल शोभे मृदु कुंतलांचा,
  सवेष्टिला हार असे फुलांचा. ।
किरीट माथा जडित प्रकाशे.
  रत्नावतंसद्युति हे विकासे. ॥ ५१ ॥

हीरांगदें शोभति बाहुदंडिं
रत्नीं कडीं हे खचितें उदंडी ।
उद्योत तो उत्कट ऊर्मिकांचा,
प्रकाश जेथें पडला नखांचा. ॥ ५२ ॥

श्रीवत्सलक्ष्मास विशेष शोभा. । वसे विधी नाभिसरोजगाभा. ॥
वक्षस्थळीं उज्वळ वैजयंती. । पदाब्ज सेवी त्रिदिवस्रवंती. ॥ ५३ ॥
पीतांबराचें परिधान साजे, । कटिप्रदेशीं रशना विराजे, ॥
त्या किंकिणींचा समुदाय वाजे, । बांकी पदीं तोडरयुग्म गाजे. ॥ ५४ ॥
आविर्भवे केवळ शंबरारिः । शृंगार किंवा अवतारधारी. ॥
जेजें, अहो, रुक्मिणिअंग पाहे । तेथेंच ते दृष्टि जडोन राहे. ॥ ५५ ॥
तथापि ते सस्मित वक्त्रचंद्रा । अमुद्र लावण्य समुद्रमुद्रा ॥
त्या मेचका सेचन काय पावी । सदृष्टि लेवा विविधा उपायीं. ॥ ५६ ॥
महातले विश्वमनोभिरामा. । कदा न पावेच विराम रामा. ॥
जो हारि हा दुर्लभ योगियांला । प्रत्यक्ष तो दर्शन लाभ झाला. ॥ ५७ ॥
मिळे दाळांकास अहो विद्याला; । किंवा अशोका सहकारशाला; ॥
हे साधकासंविध सिद्धि आली, । किंवा विरक्तान्वित शांति आली. ॥ ५८ ॥
जाला इला चरणदर्शनलाभ जेव्हां, । प्रेमार्द्र लोचन यदूद्वह होय तेव्हां. ॥
तिर्यङ्मुखी सभय लज्जित पार जाली. । कृष्णास ते नमनपूर्वक माळ घाली ॥५९॥

सख्या दोघी तीच्या सहज मग मागें परतती.
निजा सौजन्याचा निरवधिक निर्वाह करिती. ।
अहो, जन्मा आल्या उचित बहुधा हेंच इतुकें.
करावें हें तेणें नियत उरके ज्यास जितुकें. ॥ १६० ॥

न देखे वैदर्भी जवळिसखियांतें सुनयना;
न बोदलें लाजे, किमपि परते हंसगमना; ।
जयाचें हे ईणें सहज फिरतां चित्त हरिलें,
तया या श्रीरंगें त्वरित पदरीं तीस धरिलें. ॥ ६१ ॥
पृथुश्रोणिभ्रांता, उदितमदना, स्विन्नवदना,
महाभाग्यें जाली सफळनयना, कुंदरदना, ।